प्रस्तावना

॥ श्रीराम ॥

१

# श्रीवेणाबाई आणि त्यांची कविता

समर्थ देवा सद्गुरु रामा । परम पुरुषा पूर्णकामा ।
श्रीगुरुभजन न घडे आह्मां । गुरुभक्तांचीं धन्य जिणीं ॥

श्रीसमर्थांची कृपा होतां च साक्षात् पाषाण तरतात व शिळांचा उद्धार होतो, हें आपण ऐकतों, तर त्यांच्या कृपेला पात्र झाले, त्या हजारो मानवदेहधारी जीवांनीं आपल्या देहाचें सार्थक करून घेतलें, करून घेत आहेत व करून घेतील, यांत आश्चर्य काय आहे! श्रीसद्गुरुकृपेवांचून स्वतः अल्प हि कार्य झालें नाहीं, होत नाहीं व होणार नाहीं, इतका दृढ विश्वास ज्या वेळीं आपणांस पटेल त्या वेळीं आपला मोह नष्ट होईल! हा सिद्धान्त कांहीं नवीन नाहीं, पण आपची आपली श्रद्धा उडावी, असा च कांहीं योग आला आहे, त्याला इलाज नाहीं! हा हि श्रीसंकेत च ह्मटला पाहिजे! त्यांना करुणा येईल त्या च वेळीं हें तत्त्व आपणांस पटून आपण अनन्य भावानें त्यांचे चरणीं लीन होऊं. हें सारें आपणांस कळतें, पण आपली श्रद्धा उडाली, आचार सुटला, परंपरा तुटली, आपल्या ठिकाणीं उत्कटत्व राहिलें नाहीं, आपला जीव तळमळत नाहीं व दुश्चित्त मन कांहीं केल्या शुद्धीवर येत नाहीं, त्याला काय करावें! परिस्थिती च अशी यावी कीं मन उलट भांबावत जावें, बावळ्यासारखी हातून विसंगत कृति व्हावी, हा तरी काय चमत्कार ह्मणावा!

समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥

या प्रतिज्ञेवर, काय तुझा विश्वास बसत नाहीं ह्मणून, हे मना, तूं श्रीसमर्थांच्या सेवेंत आपला देह अहोरात्र झिजवीत नाहींस !

**सदा सर्वदा योग तूझा घडावा। तुझे कारणीं देह माझा पडावा॥**

हा काय नुसता भोजनप्रसंगीं ह्मणावयाचा श्लोक आहे, अशी कां तुझी समजूत झाली आहे? त्याच्या अर्थाचा तूं कांहीं तरी विचार करशील काय? समजण्याला त्यांत कठीण कांहीं च नाहीं, पण त्याच्या अर्थाकडे तूं एकांतांत कधीं पाहिलें च नाहींस, तर तुला त्याचा उमज पडावा कसा व श्रीसद्गुरुकृपेला तूं पात्र व्हावेस केव्हां !

निदान आतां एवढें तरी केलें पाहिजे कीं, ज्यांनीं श्रीसद्गुरुसेवेंत आपला देह झिजविला, सद्गुरुचरणावांचून ज्यांनीं दुसरें दैवत ओळखलें नाहीं, आपलें तनमनधन सर्वस्वी श्रीचरणीं अर्पण करून जे स्वतः तरून दुसऱ्यांला तारक झाले, अशा थोर श्रीगुरुभक्त स्त्रीपुरुषांच्या पवित्र चारित्राचा छंद घेतला पाहिजे, त्यांची वाणी श्रवण केली पाहिजे व अल्पल्पांशानें कां होईना, त्यांच्या कृतीचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अशा थोर विभूतींपैकीं महाराष्ट्रभूमीच्या पोटीं जन्मास आलेल्या श्रीवेणाबाई ह्या एक होत. त्या कोठील, कोण, त्यांनीं श्रीगुरुचरणसेवा कशी केली, त्यांच्यावर श्रीगुरुकृपा कशी झाली, त्यांनीं कोणकोणते ग्रन्थ केले, श्रीसांप्रदायांत त्यांची केवढी योग्यता होती, त्यांनीं आपला देह कोठें आणि केव्हां ठेवला इत्यादि प्रश्न मनाला करून त्यांचीं उत्तरें आठविण्यांत आजचा दिवस कंठावा असें मनांत येतें.

कोल्हापुर येथील देशपांड्यांच्या कुळांत वेणाबाईचा जन्म झाला होता. त्यांच्या जन्माचा शक कोठें दिलेला नाहीं, तेव्हां शके १५४९ च्या च सुमारास त्यांचा जन्म झाला असावा, असें मी मानतो. लहानपणापासून च त्यांची वृत्ति फार शांत असे. एकाद्या महान् योग्यानें आपल्या च ठिकाणीं जसें अखंड रममाण होऊन रहावें, तद्वत् आमच्या वेणाबाईंना मुलामुलींत खेळण्याचें न आवडतां नेहमीं आपल्या च कांहीं तरी नादांत गुंग होऊन राहणें फार प्रिय असे. आईबापांनीं लिहिण्या-

वाचण्यास शिकविलें होतें, तेव्हां चूल, वैल, बोळकीं, माजघर, कचेरी वगैरे खेळ मांडून पुढील प्रत्यक्ष प्रपंचाचें शिक्षण आपल्या मुली लहानपणीं च जशा मिळवीत असतात, तद्वत् लुटुपुटीचे खेळ खेळण्याचें वेड न लागता वेणाबाईंना पोथ्यापुस्तकाचें वेड लागलें होतें. अष्टवर्षा वेणाबाईंचें लग्न होऊन त्याना मिरजेस दिल्या. ईश्वराचा संकेत तसा होता ह्मणून बालपणीं च वेणाबाईंचे पति निवर्तले! प्रपंचाला उपजत च उबगलेल्या वेणाबाई आता सर्वस्वीं उदास झाल्या! गीताभागवतादि ग्रन्थ, हें च आपलें सर्वस्व मानून, त्या ग्रन्थाना त्यानीं केव्हा हि विसंबूं नये. भक्तिज्ञानवैराग्याचा केवळ अर्णव असा जो श्रीएकनाथांचा भागवत ग्रन्थ, तो तर त्यांना फार आवडे. त्याचीं त्यांनीं किती तरी पारायणें केलीं.

एकदां हिंडत हिंडत श्रीसमर्थ मिरजेस गेले; तेव्हां वेणाबाईंच्या सासरीं भिक्षेला गेले असतां, रघुवीराचा जयजयकार करून

मुखीं राम त्या काम बाधूं शकेना।
गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना।
हरीभक्त तो शक्त कामास मारी।
जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी॥

हा श्लोक खड्या आवाजांत ह्मणून श्रीसमर्थांनीं तुंब्राभर दुधाची भिक्षा मागितली. तेथें वेणाबाईंच्या सासुबाई होत्या, त्यानीं श्रीसमर्थांकडे न पाहता च, दूध आहे पण तें मारुतीसाठीं ठेवलें आहे, तेव्हां देता येत नाहीं, असें सांगितलें. वेणाबाईंनीं पाहिलें तों

नवस जयाचा तो चि आला स्वयें॥

असें त्यांस भासलें. त्यांतील च थोडेंसें तरी दूध द्यावें ह्मणून सासुबाईंची परवानगी घेऊन तें आणावयास वेणाबाई आत गेल्या तों इकडे श्रीसमर्थ मार्गस्थ झाले. वेणाबाईंना वाईट वाटलें. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर पुन्हा श्रीसमर्थ भिक्षेस आले असतां वेणाबाई पुढच्या चौकांत

वृंदावनापाशीं भागवत ग्रन्थ वाचीत बसल्या होत्या. मुली, कोणता ग्रन्थ वाचतेस, त्यांत काय सांगितलें आहे; सांगितल्याचा कांहीं प्रत्यय येतो कां? इत्यादि प्रश्न श्रीसमर्थांनीं विचारिले. भक्तिभावानें ग्रन्थ वाचावा एवढें च मला ठाऊक, त्यांतील ज्ञान मला कोठून असणार, असें ह्मणून वेणाबाईंनीं श्रीसमर्थांना पंचवीस प्रश्न केले. ते पंचवीस प्रश्न एका अभंगांत गोंवून व त्यांच्या उत्तरांचा दुसरा एक अभंग रचून श्रीसमर्थांनीं ते दोन्ही अभंग वेणाबाईस लिहून दिले. वेणाबाईंची ही केवढी थोर पुण्याई !

पंचवीस प्रश्न *

नमूं वागेश्वरी शारदा सुंदरी ।
श्रोता प्रश्न करी वक्तयासी ॥ १ ॥
वक्तयासी पुसे जीव हा कवण ।
शिवाचें लक्षण सांगा स्वामी ॥ २ ॥
सांगा स्वामी आत्मा कैसा तो परमात्मा ।
बोलिजे अनात्मा तो कवण ॥ ३ ॥
कवण प्रपंच कोणें केला संच ।
मागुता विसंच कोण करी ॥ ४ ॥
कोण ते अविद्या सांगिजे जी विद्या ।
कैसें आहे आद्याचें स्वरूप ॥ ५ ॥
स्वरूप ते माया कैसी मूळमाया ।
ईस चाळावया कोण आहे ॥ ६ ॥
आहे कैसें शून्य कैसें तें चैतन्य ।
समाधान अन्य तें कवण ॥ ७ ॥
कवण जन्मला कोणा मृत्य आला ।
बद्ध मुक्त जाला तो कवण ॥ ८ ॥

* मालेंतील तिसरा भाग "श्रीरामदासांची कविता" पान २४२, ६४ वा अभंग पहा.

कवण जाणता कोणाची हे सत्ता ।
मोक्ष हा तत्त्वता कोण सांगा ॥ ९ ॥
सांगा ब्रह्मखूण सगुण निर्गुण ।
पंचवीस प्रश्न ऐसे केले ॥ १० ॥

त्यांचीं उत्तरें *

नमूं वेदमाता नमूं त्या अनंता ।
प्रश्न सांगों आतां श्रोतयाचे ॥ १ ॥
श्रोतयाचे प्रश्न जीव हा अज्ञान ।
जया सर्व ज्ञान तो चि शिव ॥ २ ॥
शिवपर आत्मा त्यापर परमात्मा ।
बोलिजे अनात्मा अनुर्वाच्य ॥ ३ ॥
वाच्य हा प्रपंच माईक जाणावा ।
घडमोडी देवापासुनियां ॥ ४ ॥
विपय अविद्या त्यालावी ते विद्या ।
निर्विकल्प आद्याचें स्वरूप ॥ ५ ॥
कल्पना हे माया तत्त्व मूळमाया ।
यासी चाळावया चैतन्य चि ॥ ६ ॥
नकार तें शून्य व्यापक चैतन्य ।
ईश्वर अनन्य समाधान ॥ ७ ॥
जीव हा जन्मला जीवा मृत्य आला ।
बद्ध मुक्त जाला तो चि जीव ॥ ८ ॥
ईश्वर जाणता ईश्वराची सत्ता ।
मोक्ष हा तत्त्वता ईश्वर चि ॥ ९ ॥
ईश्वर निर्गुण चेष्टवी सगुण ।
हे चि ब्रह्मखूण दास ह्मणे ॥ १० ॥

---

*तील तिसरा भाग पान २३०, अभंग ३९ वा पहा.

दास ह्मणे सर्व मायेचें करणें ।
मिथ्यारूप जाणे अनुभवी ॥ ११ ॥

असे दोन अभंग देऊन श्रीसमर्थ चालते झाले. त्यांची ती दिव्य मूर्ति पाहून व उपदेश श्रवण करून वेणाबाईंनीं श्रीसमर्थचरणीं मनानें लोटांगण घातलें !

पाईं पादुका हातांत तुंबा । भर्जरी भगवी फांकली प्रभा ।
कटबंद कौपीन माळ सूत्र शोभा । न वानवे मूर्ति साजिरी ॥

अशा त्या मूर्तीचा सहवास घडून नरजन्माची सफलता व्हावी असें वेणाबाईंच्या मनानें घेतलें. श्रीसमर्थ भिक्षा घेऊन गेले आणि वेणाबाईंना श्रीसद्गुरुचरणांचें वेड लागलें. श्रीएकनाथांनीं आपल्या भागवतांत ह्मट-ल्याप्रमाणें वेणाबाईंची स्थिति झाली.

सद्गुरुप्राप्तिचिया काजा । लाहानथोरांची करी पूजा ।
अत्यादरें मानी द्विजा । गुरु मज माझा भेटावा ॥ १०–१३४
अस्वलाचिया परी । गुरुनामाचा जप करी ।
गुरुवांचोनि निरंतरीं । चिंता न करी आनाची ॥ १३५ ॥
आसनीं भोजनीं शयनीं । गुरुतें न विसंबे मनीं ।
जागृतीं आणि स्वप्नीं । निदिध्यासनीं गुरु केला ॥१३६॥
गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे ताहान भूक ।
विसरली देह गेह सुख । सदा संमुख परमार्थी ॥ १३७ ॥

अशी वेणाबाईंची स्थिति झाली. त्यांना दुसरें तिसरें कांहीं दिसेनासें झालें. “ जय जय रघुवीर समर्थ ” एवढे च शब्द आपण ऐकत आ-होंत असें त्यांच्या कानांना वाटे. बाह्यसृष्टीकडे त्यांचे डोळे पहात आ-हेत असें इतरांस वाटे पण अंतर्दृष्टीनें सर्वत्र त्यांना श्रीसमर्थांची च मूर्ति दिसत होती. खातां पितां, उठतां बसतां, काम करतां स्वस्थ अ-सतां, त्यांच्या मनानें एक च छंद घेतला होता. त्यांना एकसारखा एक च ध्यास लागला होता.

तैसी मूर्ति दृष्टी पडो । तैशा पाईं वृत्ति जडो ॥ १ ॥
ब्रह्मचारी सूत्र शिखा । पाईं शोभती पादुका ॥ २ ॥
कटीं अडबंद कौपीन । कंठीं तुळसीमणिभूषण ॥ ३ ॥
दिव्य मुख दिव्य नेत्र । भाळीं आवाळु सुंदर ॥ ४ ॥
रामदास दिव्य नाम । सखा ज्याचा आत्माराम ॥ ५ ॥
" ऐशा सद्गुरुचरणावरी । किंकर लोळे दासापरी " ॥ ६ ॥

इतका निदिध्यास श्रीसद्गुरूचा लागल्यावर त्यांची कृपा होण्यास मुळीं च विलंब लागत नाहीं असा सिद्धान्त आहे. सद्गुरुकृपेचा महिमा च असा आहे कीं, इतकी तळमळ लागल्यावर सद्गुरुकृपा व्हावी ह्मणून इतर साधनें करून शिणावें लागत नाहीं.

सद्गुरुप्राप्तीसाठीं तळमळणाऱ्या वेणाबाई थोड्या च दिवसांनीं सासराहून माहेरीं कोल्हापुरास गेल्या, तेव्हां तेथें श्रीसद्गुरुसमर्थांची स्वारी शिष्यसमुदायासह आलेली असून त्यांचीं कीर्तनें चालू होतीं. आई-बापांना विचारून वेणाबाई नित्य नियमानें कीर्तनश्रवणास जात. श्रीसमर्थांच्या मुखींचें कीर्तन ऐकण्याचें भाग्य कोणाचें आहे ! त्यांच्या कीर्तनांत हजारों श्रोते देहबुद्धि विसरून व भक्तिप्रेमानें वेडे होऊन श्रीसद्गुरुचरणीं लोटांगणें घालीत, हें न सांगतां हि समजण्यासारखें आहे. श्री छत्रपति शिवाजीमहाराजासारख्यांना ज्या चरणांचें वेड लागलें त्या च चरणांना श्रीवेणाबाई अनन्य भावानें शरण गेल्या. श्रीसमर्थांनीं त्यांच्यावर कृपा केली. वेणाबाईंचे पूर्व पुण्य उदयास येऊन त्या "रामनामें मुद्रांकित" होऊन कृतार्थ झाल्या. त्यांची ही परमार्थवृत्ति त्यांच्या सासुसासऱ्यांना किंवा आईबापांना, सर्वस्वीं आवडली असें मात्र नव्हे. तसें च त्या वेळीं ह्मणजे कोणी चटोर व दुष्टबुद्धि लोक नव्हते च असें हि नाहीं. त्यांनीं वेणाबाईंची निंदा करावी व आईबापांना आणि सासुसासऱ्यांना नांवें ठेवावीं. लोकांचीं अनन्वित बोलणीं ऐकून आईबापांना वाईट वाटे. 'मुली हा राघवाचा पंथ सोड ह्मणून त्यांनीं सांगून पाहिलें, पण वेणाबाईंनीं त्यांना एक च उत्तर द्यावें.

पद

रामनामेंविण मज कंठेना ॥ ध्रु० ॥

कोणी वंदिती कोणी निंदिती । वास मी त्यांची पाहिना ॥ १ ॥
हृदईं धरिलें सद्गुरुचरणा । प्राणांतीं हि विसंबेना ॥ २ ॥
वेणीचें निजधन राम चि जीवन । होणार तें कां सुखें होइना ॥३॥

असली गुरुभक्ति आपल्या वाट्याला येण्याचें तर दूर च, पण आतां कोठें नुसती पहावयास तरी सांपडेल काय ?

अखंड सहवास होऊन निरंतर श्रीचरणसेवा घडावी, अशी वेणाबाईंनीं श्रीसमर्थांची प्रार्थना केली; पण अजून वेळ आली नाहीं असें सांगून व श्री श्लोक मनाचे, अभंग, पदें, वगैरे निरंतर वाचण्यास व त्यांचें एकांतांत मनन करण्यास सांगून श्रीसमर्थ पर्यटणास गेले. वेणाबाई माहेरीं च होत्या, पण आपले मायबाप सद्गुरुराय आपणांस सासरीं टाकून गेले असें वेणाबाईंना वाटलें ! आणि निवृत्ति ह्मणजे च काय तें खरें माहेर व प्रवृत्ति ह्मणजे वस्तुतः सासर च होय, असें मानल्यास वेणाबाई माहेरीं असून हि अजून सासरीं च होत्या असें ह्मटलें पाहिजे. तें कांहीं असो, पण श्रीसद्गुरुचरण अंतरले ह्मणून वेणाबाईंना अतोनात दुःख झालें. त्यांची परमार्थबुद्धि जों जों वाढत चालली तों तों जननिंदेला हि जोर येत चालला. स्वतःचा सर्वस्वीं मानसिक अधःपात पतकरून हि निंदक दुसऱ्याचें बरें करीत असतो, तेव्हां निंदकासारखा परोपकारी दुसरा कोणी नाहीं, असें ह्मटलें पाहिजे. स्वतःच्या मातेपरीस हि निंदकाची योग्यता अधिक आहे असें वेणाबाईंना वाटे.

माता थोर कीं पाहतां जनीं । ते मल काढी पृथक भाजनीं ।
धन्य माझी निंदक जननी । जिव्हाकरूनि क्षाळिजे ॥

पण आईबापांना मात्र जननिंदा दुस्सह वाटूं लागली. यापेक्षां " कारटी मरती तर बरें होतें " असें त्यांना झालें ! असें ह्मणतात कीं आईबापांनीं अखेरीस वेणाबाईंना विष दिलें, पण

सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ।
उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥

हें आपलें स्तत.चें वचन व अनन्य भक्ताचें रक्षण करण्याचें आपलें ब्रीद सांभाळण्यासाठीं स्वामी समर्थ अचानक तेथें प्रगट होऊन त्यांनीं वेणाबाईना विघ्नबाधा होऊ दिली नाहा ! इतका छळ झाल्यावर श्रीसमर्थशिष्यसमुदायाबरोबर जाण्यास वेणाबाई खऱ्या खऱ्या अधिकारी झाल्या ! स्वत: कृतार्थ झालेल्या वेणाबाई आतां इतरास हि उपदेश करूं लागल्या.

पद *

चाल–भज भज भवजलधिमाजि–

धन्य होणें सफळ जिणें रामगुणें होतें ।
ध्यास पडे ज्यास त्यास सत्य फळों येतें ॥ ध्रु० ॥
काळ वेळ हे सफळ हित करा कांहीं ।
सर्व काळ सुखवेळ राम भजा भाई ॥ १ ॥
काय जना कोण मना मानलें हें सार ।
रामवीण सर्व सीण दुःख अनिवार ॥ २ ॥
चळे पळे निमिष घडी जात लवलाही ।
आजि घडे तसें हें चि उद्यांलागि नाहीं ॥ ३ ॥
सर्व सोडी राम जोडी भजनीं निःकाम ।
धन्य तुह्मी धन्य आह्मी गाऊं रामनाम ॥ ४ ॥
हा हि लोक परलोक त्यास सासुरवाडी ।
वेणी ह्मणे भक्तजना भजनें राम जोडी ॥ ५ ॥

श्रीसमर्थसगतींत जे शिष्य असत त्याजकडे कांहीं कांहीं कामें सोंपविलेलीं असत. श्रीकल्याणस्वामी हे तर मुख्य प्रधान च होत. पुराण सांगण्याचें काम वासुदेव गोसावी याजकडे असे, आल्यागेल्याची खबर देण्याचें काम मुसळराम गोसावी हे करीत, कोठीवरील देखरेखीचें काम दत्तात्रयस्वामी पहात, स्वयंपाकावर आक्काबाईची नेम-

* डोमगावमठ बाड १४ यांत हें पद आहे.

णूक होती, अनंत गोसावी यांनीं कीर्तनाची व्यवस्था ठेवावी, कृष्णा न्हावी यांनीं रोशनाई करावी, दिवाकरांनीं देवपूजेकडे असावें, अशीं जीं अनेक कामें शिष्यांवर सोंपविलीं होतीं, त्यांत उपहाराची तजवीज ठेवण्याचें काम वेणाबाईकडे असे. नेमलेलें काम करून बाकी उरणारा सारा वेळ वेणाबाईंचा कसा जात असला पाहिजे याची कल्पना च केली पाहिजे. वेणाबाईंच्या पारमार्थिक योग्यतेविषयीं आपण काय लिहावें ! तथापि परमार्थांतलें ज्यांना कांहीं समजत असेल त्यांना वेणाबाईंचा अधिकार केवढा होता याची कल्पना त्यांच्या त्या एका च पदावरून होणार आहे. श्रीसमर्थप्रतापाची प्रस्तावना लिहिली त्या वेळीं तें पद गिरिधरांचें असावें असें मला वाटलें होतें, पण ती माझी चूक होती. तें पद वेणाबाईंचें च आहे याबद्दल आतां लवमात्र शंका नको. प्रतापाच्या प्रस्तावनेंत तें पद दिलें च आहे, पण तें वेणाबाईंचें आहे या दृष्टीनें वाचकांनीं तें वाचावें ह्मणून व शिवाय हें पद च इतकें गोड आहे कीं त्याची पुनरावृत्ति केव्हां हि कंटाळवाणी वाटणार नाहीं ह्मणून हि, तें पद येथें देतों. वेणाबाईंच्या योग्यतेची, गुरुभक्तीची, निष्ठेची, ज्ञानाची, अधिकाराची, सामर्थ्याची व निःशंकपणाची कल्पना त्या पदावरून वाचकांस होणार आहे.

पद

गुरु निशब्दाचीं वीजें । आह्मा प्राप्त आत्मकाजें ॥ १ ॥
आह्मी अबोल अबोल । अबोलें बोलूं बोल ॥ ध्रु० ॥
आमुची माया वांज जाली । परब्रह्मीं लया गेली ॥ २ ॥
शब्द आकाशीं निमाला । आत्माराम अवघा जाला ॥ ३ ॥
वेणीस्वामियाच्या संगें । आह्मी राहों आत्मरंगें ॥ ४ ॥

भवस्वर्ग मनोभास । मनोभास केला नास ॥ १ ॥
आह्मी आत्माराम रामीं । रामीं राम परंधामी ॥ ध्रु० ॥
आह्मी मन मागें केलें । मनासवें अवघें गेलें ॥ २ ॥
वेणीस्वामियाचा संग । येकसरा मनोभंग ॥ ३ ॥

आमुच्या वाटे नका जाऊं । नये ते वाटे तुह्मा लाऊं ॥ १ ॥
आह्मी पारिखे पारिखे । न हों लोकिकासारिखे ॥ ध्रु० ॥
अशी स्थिति जाली मोठी । पोटीं ब्रह्मांडाच्या कोटी ॥ २ ॥
वेणीस्वामी आत्माराम । तें चि आमुचें परंधाम ॥ ३ ॥

गुरुवाक्यप्रेमनौका । मायासागर तरलों देखा ॥ १ ॥
आह्मी स्वामीचे अंकित । रामनामें मुद्रांकित ॥ ध्रु० ॥
अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें ॥ २ ॥
आली अनुभवाची खूण । खूण केली रामार्पण ॥ ३ ॥
वेणीस्वामी अवघा जाला । विज्ञानासी अंत आला ॥ ४ ॥

देह माझें मन माझें । सर्व नेलें गुरुराजें ॥ १ ॥
आह्मी गुरुनाथपंथी । ज्ञानमुद्रा दिधली हातीं ॥ ध्रु० ॥
कर्णीं चढली नामसुद्रा । मुखीं अगोचरी मुद्रा ॥ २ ॥
कान फाडुनि जोगी जालों । संतदर्शनासी आलों ॥ ३ ॥
वेणीस्वामीचें दर्शन । मायासंकेतनिर्शन ॥ ४ ॥

लौकिक दृष्टीनें पाहिलें तर वेणाबाई थोर विदुषी होत्या. भारत, भागवत, रामायण इत्यादि ग्रन्थ त्याना चागले अवगत होते. पूर्व कालीं होऊन गेलेल्या साधुसताच्या ग्रथाचें हि त्यानीं परिशीलन केलें होतें. श्रीसमर्थसाप्रदायापैकीं च केवळ नव्हे तर इतर हि कोणा एकाद्या श्रीशिवकालीन महाराष्ट्रस्त्रीचा ग्रन्थ असल्याचें मला ऐकून ठाऊक नाहीं. साप्रदायापैकीं व इतर स्त्रियाचीं स्फुट पदें, अभग, श्लोक वगैरे आहेत, पण वेणाबाईखेरीज इतर कोणत्या हि स्त्रीचा स्वतन्त्र ग्रन्थ नाहीं असें मला वाटते. प्रस्तुतच्या ग्रन्थाशिवाय त्याचीं दोन स्फुट प्रकरणें व काहीं अभग, पदें, आरत्या वगैरे उपलब्ध आहेत. याशिवाय “ सिंहासन ” व “ उपदेशरहस्य ” अशीं त्याचीं आणखीं दोन प्रकरणें व किती एक अभग, पदें, वगैरे असावींत, असें माझें नुसतें अनुमान आहे. जीं दोन प्रकरणें उपलब्ध आहेत ह्मणून

ह्मणतों: तीं २६ श्लोकांचें " कौल " व ४४ श्लोकांचें "श्रीरामगुह-संवाद " हीं होत.

(१) कौल

रावणाचा वध करून चौदा वर्षांनीं राम सीतेसह परत येऊन भरतास भेटले. नंतर ते सिंहासनाधिष्ठित झाल्यावर प्रजा त्यांजपाशीं कौल मागावयास आली. कौल ह्मणजे राजाकडून प्रजेस मिळणारें अभयपत्र. तेव्हां प्रजेनें रामापाशीं कोणता कौल मागितला तो ह्या श्लोकांत दिला आहे. मागा तुह्मांला काय पाहिजे तें, असें प्रभु रामचंद्रानें आश्वासन दिल्यावर प्रजेनें एक एक मागणें मागावें व रामानें तें लिहून ठेवण्यास लक्ष्मणास सांगावें, असा या प्रकरणाचा विषय आहे.

रघूराज सिंहासनीं सौख्यदाता ।
प्रजा कौल मागावयाला उदीता ।
प्रभू बोलिला रे अपेक्षीत मागा ।
नका हेत ठेऊं समस्तैक सांगा ॥ १४ ॥

आपलीं सर्व गाऱ्हाणीं ऐकून घेऊन तीं दूर करण्याविषयीं राजाराम तत्पर आहेत असें पाहून प्रजेनें मोकळ्या मनानें एक एक मागणें मागावयास सुरवात केली, बाकी ह्मणून कांहीं ठेवली नाहीं.

बहू कष्टलों पातलों जी स्वदेशा ।
प्रजा बोलती कौल दे राघवेशा ।
भुमीनें कदा पीक सांडूं नये रे ।
वदे राम लक्षुमणा हें लिही रे ॥ १५ ॥
समर्था कदा रोगवारें नको रे ।
वदे राम लक्षुमणा हें लिही रे ॥ १७ ॥

अशा रीतीनें प्रजेनें रामापाशीं सर्व कांहीं मागितलें. पेवें, धन, धान्य, गाई, बैल, गाड्या, भाग्य, मनासारिखीं पुत्रकन्याकलत्रें, समृद्धि, सौख्य, सुस्वरूपता, तारुण्य, शक्ति, शुभ ग्रह, निर्विघ्नता, धर्मपरायणता, दया, चातुर्य, पुण्य वासना, अमरत्व, निष्कपटपणा, पवित्रपणा इत्यादि

इत्यादि ओंवी क्षणून जें कांहीं सुचलें तें त्यानें तेथल्या तेथें सर्वांच्या तर्फेनें मागून घेतलें. जणूं काय जेवढें मागितलें, तें थोडें च झालें, असें वाटून प्रजेनें रामापाशीं आणखी एक मागणें मागितलें कीं, आतां सुचलें तें मागितलें आहे, पण यापुढें आणखी केन्हां हि कांहीं आठवलें तर तें मागावयास आह्मी तुझ्या दरबारीं येऊं, तेन्हां थेट तुझ्या चरणापाशीं येऊन दाद मागण्यास आह्मांस दरम्यान कोणाची आडकांठी ठेवूं नकोस.

तुझ्या दर्शनीं आडकांठी नको रे ।
वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ २५ ॥

आणि प्रजेनें रामापाशीं शेवटचें मागणें मागितलें:

प्रभु क्लेश घेऊनि विश्रांति द्यावी ।
देहे तोंवरी भक्ति तूझी घडावी
देणीस्वामि ऐशापरी कौल दे रे ।
वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ २६ ॥

(२) श्रीरामगुहसंवाद

श्रीरामगुहसंवादाचे ४४ श्लोक आहेत. हें हि प्रकरण पहिल्या इतकें च गोड आहे. त्रैलोक्याधिपति रामचंद्र, जानकी व लक्ष्मण यासह वनवासास निघून भागीरथीच्या पवित्र तीरीं आले. आपणांस गंगापार नेण्याविषयीं रामानीं गुहाची प्रार्थना केली, तेन्हां आपण कोण क्षणून गुहानें त्यांना प्रश्न केला. त्याचें उत्तर राम देतात—

असो तापसी तीर्थवासी वनासी ।
तपा जातसो ऊतरी गूणरासी ।
तुझी तोयतारी त्वरें आणि तीरीं ।
परदेसिया पाववीं पैलपारी ॥ ३ ॥

रामाच्या या क्षणण्यावर गुहाचा मुळीं च विश्वास बसला नाहीं; आणि कोणाचा बसला असता ? त्याच्या त्या रम्य, सुकुमार मूर्ति

पाहून; हे तापसी तीर्थवासी आहेत असें कोणास खरें वाटलें असतें ? गुहानें आपला संशय स्पष्ट दर्शविला च.

नव्हा तापसी ना नव्हा तीर्थवासी ।
नव्हा या जनासारिखे क्षेत्रवासी ।
चहूं आश्रमावेगळीं भासताहा ।
नये नेम कर्ता असे दीसताहा ॥ ६ ॥

त्या त्रिवर्गांची शांत व गंभीर वृत्ति पाहून गुहाची त्यांच्यावर पूर्ण भक्ति बसली. आपण कोण आहांत तें खरें सांगा, आपण तापसी किंवा तीर्थवासी नसून कोणी तरी थोर विभूती आहांत; पण मला निश्चय करतां येत नाहीं, आपलें नांव कृपा करून सांगा.

वदा नाम स्वामी चहू कंठ दाटे ॥ ११ ॥

गुहाची अकारण जडलेली भक्ति पाहून श्रीरामाच्यानें उडवाउडवीचें उत्तर देववेना.

जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना ।
आपुली स्थिती अनुमाना । येवों च नेदी ॥

इत्यादि शिकवण जरी खरी असली तरी ती कोणापाशीं ? गुहाची निष्कपट निष्ठा पाहून रामांनीं त्यास आपली सर्व स्थिति, गति कळविली. तेव्हां गुहानें अत्यंत प्रेमभरानें

जुनें कांवळें जें मळगांदलेसें ।
अती जीर्ण वैसावया घातलेसें ।
वरें आणिलें तोय त्या जान्हवीचें ।
मिती क्षाळिले पाय त्या राघवाचे ॥ २९ ॥

त्यानें रानफुलांनीं श्रीरामाची पूजा केली व वनफळांचा त्यांना नैवेद्य अर्पण केला. नंतर त्रिवर्गास गुहानें परतीरास नेऊन पोहोंचविले. श्रीराम प्रसन्न होऊन त्यांनीं गुहास वर मागावयास सांगितलें, तेव्हां

पदपंकजीं ठाव दीनास द्यावा ।
सखा आपुला मित्र ऐसा ह्मणावा ॥ ४१ ॥
पुन्हा मागुतें या चि पंथें चि यावें ।
दिनानाथ सनाथ मातें करावें ।
जयश्री सर्वें साजरी ते पहावें ।
असें आर्त माझें असे पूरवावें ॥ ४२ ॥

असा गुहानें वर मागितला व श्रीरामानें तथास्तु ह्मटलें. नंतर राम तेथून मार्ग पुसत पुसत पुढें गेले.

वेणीस्वामि पंथावलोकी स्वभावें ।
वना दंडका कोण मार्गेण जावें ।
विधीनिर्मिता तो पथा पूसताहे ।
न जाणों महीमा कसी काय आहे ॥ ४४ ॥

अशीं वेणाबाईचीं दोन लहान पण प्रेमळ स्फुट प्रकरणें आहेत, त्यावरून माझा असा तर्क आहे कीं, रामायणातील इतर कित्येक प्रसंगासंबधानें त्याचीं अशीं च आणखीं कित्येक स्फुट प्रकरणें असावींत. तीं भाग्यानुसार हातीं येतील तेव्हां खरीं. "सिंहासन" व "उपदेशरहस्य" अशा दोन प्रकरणाचा अस्पष्ट उल्लेख श्रीदासविश्रामधामांत आला आहे, त्यावरून त्याचीं अशीं दोन प्रकरणें असावींत, असें माझें अनुमान असल्याचें मी वर ह्मटलें च आहे. वेणाबाईंच्या उपलब्ध असंगपदांपैकीं प्रसंगवशात् कांहीं वर आलीं च आहेत; असो.

वेणाबाईंचा स्वतंत्र असा ग्रन्थ फक्त प्रस्तुतचा "श्रीसीतास्वयंवर" एवढा च उपलब्ध आहे. याशिवाय गिरिधराप्रमाणें त्यांनीं कांहीं रामायणें रचलीं असल्यास व तीं यापुढें उपलब्ध व्हावयाचीं असल्यास ईश्वर जाणे ! सकेलरामायणापैकीं पहिलीं सहा कांडें वेणाबाईकृत असावींत, अशी माझी कल्पना आहे व ती प्रतापाच्या प्रस्तावनेंत नमूद केली च आहे.

## ( ३ ) श्रीसीतास्वयंवर

हा ग्रन्थ आज वाचकांचे हातीं प्रत्यक्ष पडत असतां त्याविषयीं वास्तविक मी कांहीं लिहावयास पाहिजे असें नाहीं. तथापि मला तो ग्रन्थ फार आवडला तसा च तो इतरांस हि आवडावा म्हणून माझ्या आवडीचीं कारणें कोणतीं तीं सांगावशीं वाटतात.

आपल्या सर्व साधुसंतांच्या ग्रन्थांची जी योग्यता ती च या ग्रन्थाची आहे. स्वतःकडे कर्तृत्व घेऊन कोणा हि सत्पुरुषाच्या-मुखांतून एक हि शब्द निघाला नाहीं. आपल्या महाराष्ट्रांतील सारस्वतांत, असा एकादा तरी सत्पुरुषाचा ग्रन्थ आहे कां, कीं ज्याचें कर्तृत्व ग्रन्थकारानें स्वतःकडे घेतलें आहे?

**सकळ करणें जगदीशाचें । आणि कवित्व चि काय मानुशाचें ।**
**ऐशा अप्रमाण बोलण्याचें । कायें घ्यावें ॥**

ही च ज्याची त्याची प्रतीति. सत्पुरुषांची वाणी औपचारिक मुळीं च नसते, ती सत्य असते. आपल्या ग्रन्थाचें कर्तृत्व आपआपल्या उपास्य देवतेकडे सोंपविण्यांत त्यांनीं लौकिक भाषा केव्हां हि वापरली नसून यथार्थ भाषा वापरली असते. लौकिक दृष्टीच्या आपणासारख्यांना यांतील गूढ समजण्याची हि मारामार, तेथें अनुभव कोठचा! या गुह्य गोष्टी कोणास सांगाव्या अशी वेणाबाईंना पंचाईत च पडली.

हें सीतेचें सैंवर । वाल्मीक बोलिला विस्तार ।
रम्य रसाळ सुंदर । नाना विळासें करूनि ॥ १४--४७
वाल्मीक बोलिला गहन । तें वांछित होतें मन ।
तव त्याचा साभिमान । सर्वज्ञ रायें घेतला ॥ ४८ ॥
हें बोलणें येथार्थ । कर्ता राम याचा समर्थ ।
कोणा-सांगों हा गुह्यार्थ । माझा मी च जाणें ॥ ४९ ॥

असा हा प्रासादिक ग्रन्थ आहे. जसा तो प्रासादिक आहे तशी च त्याची फलश्रुति हि सामान्य नाहीं. प्रत्येक ग्रन्थाला फलश्रुति

ही पाहिजे च, ह्मणून ग्रन्थकारानें आपल्या ग्रन्थाचा कांहीं तरी गौरव केला असतो, असें निदान प्रासादिक ग्रन्थाबद्दल तरी कोणी कधीं हि मानूं नये. ग्राहकाला ग्रन्थ घेण्याला किंवा वाचकाला तो वाचण्याला प्रोत्साहन मिळावें ह्मणून कांहीं प्रासादिक ग्रन्थकार फलश्रुति सांगत नसतात. ह्या स्वार्थपर भावना स्वार्थसाधु लोकांना शोभतील, पण अशी इतरांची मनधरणी करून साधुसंतांना काय मिळवयाचें असतें ?

भक्ति करितां याचें पठण । अथवा करितां श्रवण ।
त्याचे मनोरथ पूर्ण । कर्ता राम समर्थ ॥ १४–५३ ॥
हें वचन नव्हे मनधरणी । या ग्रन्थाची हे आयणी ।
प्रसिद्ध त्रैलोक्य मिरवणी । ठसा रामकथेचा ॥ ५४ ॥
जें जें भक्ताचे अंतःकर्णीं । तें तें पुरवी च्यापपाणी ।
याकारणें सर्वगुणी । रघुनाथजि भजावें ॥ ५६ ॥

अशी या ग्रन्थाची फलश्रुति आहे.

ग्रन्थाचा विषय नांवावरून च व्यक्त होत आहे. सीतेचें स्वयंवर, वेणाबाईच्या पूर्वी व नंतर, पुष्कळांनीं वर्णिलें आहे; पण वेणाबाईच्या ग्रन्थाची योग्यता कांहीं निराळी आहे. स्वयंवरासारख्या प्रसगाची आवड स्वभावतः स्त्रियांना असावयाची आणि ह्मणून त्याच्या लेखणींतून तो प्रसंग जसा उतरेल तसा इतरांच्या उतरणार नाहीं, असें ह्मणण्यांत कोणाचा उपमर्द करण्याचा हेतु असूं शकणार नाहीं; कारण इतरांचीं हि स्वयंवरें आपआपल्या परीनें उत्कृष्ट नाहींत, असें कोण ह्मणेल ? वेणाबाईच्या सीतास्वयंवरात प्रत्येक लहान मोठ्या प्रसंगाचें जसें यथासांग वर्णन आहे, तसें दुसऱ्या एकाद्या ग्रंथांत असल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. या माझ्या ह्मणण्याचा कोणी हि विपरीत अर्थ करूं नये. माझ्या ह्मणण्याचा भावार्थ इतका च कीं, हा असला प्रसंग यथासांग वर्णन करण्याचा अधिकार जसा एकाद्या स्त्रीला असतो तसा तो पुरुषाला नसतो. श्रीएकनाथांचा रुक्मिणीस्वयंवर ग्रन्थ वेणाबाईच्या सीतास्वयंवराशीं ताडून पाहिला ह्मणजे माझ्या ह्मणण्याची सत्यता

वाचकांस सहज पटेल. रुक्मिणीस्वयंवर ग्रन्थ सर्वोत्कृष्ट आहे हें काय कोणी कोणास सांगावयास पाहिजे ? पण असें असून हि जें एकनाथांच्या ग्रन्थांत नाहीं तें वेणाबाईंच्या ग्रन्थांत आहे व उलट पक्षीं जें सीतास्वयंवरांत नाहीं तें रुक्मिणीस्वयंवरात आहे. रुक्मिणीस्वयंवराचा प्रसंग वेगळा आहे तो सोडून दिला तरी प्रत्यक्ष लग्नसोहळा एकनाथांनीं त्रोटक वर्णिला आहे, तो वेणाबाईंनीं साद्यन्त वर्णिला आहे व एकनाथांनीं अथपासून इतिपर्यंत आपली अध्यात्मदृष्टि अढळ ठेवली आहे तर वेणाबाईंनीं आपली भक्तिप्रेमाची दृष्टि कोठें हि ढळूं दिली नाहीं. तथापि, आपण ही तुलनात्मक दृष्टि सोडून देऊन एकट्या सीतास्वयंवराकडे च अनन्य भावानें पहावें हें उत्तम.

राम गुणाचा सागरु । राम सुखाचा सुरतरु ।
राम भक्तांचें माहेरु । राम विसावा जनाचा ॥ १-१२ ॥
राम मनाचें मोहन । राम जीवाचें जीवन ।
राम सदां समाधान । ज्ञानियाचें ॥ १३ ॥
राम पुजावा विळासी । राम ध्यावा अहिर्णेसी ।
रामावेगळें मनासी । कांहीं नावडे ॥ १४ ॥

यांत जें भक्तिप्रेम आहे तें च सर्व ग्रन्थांत भरलें आहे. असा हा प्रेमळ ग्रन्थ सर्वांनीं च निदान एक वेळ तरी वाचावा व श्रीरामोपासक गुरुभक्तांनीं त्याचीं पारायणें करावींत. इतिहाससंशोधकांनीं हि तो वाचावयास पाहिजे, कारण त्यांत तिसऱ्या समासांत आलेलीं देशांचीं नांवें, नवव्या समासांतील स्त्रियांच्या दागिन्यांचें वर्णन, अकराव्यांतील धाकाराचें विवेचन, बाराव्यांतील भोजनाचे पदार्थ, इत्यादि कित्येक स्थळें त्यांना महत्त्वाचीं वाटतील. ज्यांना सुभाषितें निवडावयाचा छंद असेल अशांनीं हि सर्व ग्रन्थाचें एकवार आलोडन केलें पाहिजे कारण,

क्षोभलिया ऋपेश्वरा । काळ न राहे सामोरा ।
कुळक्षय नृपवरा । याचिया कोपें ॥ १-५२

मागावया ये याचक। त्यासी दवडितां निरार्थक।
सामर्थ्य असोन कोण्ही येक। तो अधर्मी जाणावा ॥५४॥

असलीं शेकडों बोधपर वचनें या ग्रन्थात सर्वत्र विखुरलेलीं आहेत. दहाव्या समासातील वेणाबाईकृत मंगलाष्टकें, प्रसंगीं उपयोगीं पडावीं म्हणून, पाठ करून ठेवावीं असें कुळाचार्यांना वाटणार आहे.

तत्काळ उद्धार गोरटी। रामचरणीं घाली मिठी।
म्हणे जय जय जी जगजेठी। बहुत दिवस कष्टले ॥३-३७॥
स्त्रीदेहाचा समंधु। भोगीत होते अपराधु।
मजकारणें दीनबंधु। कोणेकडून आलासी ॥ ३८ ॥
चौ खाणी वेगळा। देहे धरिला होता सीळा।
मजकारणें दीनदयाळा। अरण्य शोधीत आलासी ॥ ३९ ॥
अवघ्याहून नीच यातना। जेथें उपाये चि चालेना।
ते संकटींहूनि पावना। मातें मुक्त केलें ॥ ४० ॥
मज पाषाणाचें अंतर। जाणोनि केला उद्धार।
सर्वज्ञ नामाचा वडिवार। प्रचीतीसी मज आला ॥ ४१ ॥
रविवंशजा रघुनंदना। जन्मोजन्मीं उपासना।
तुझें चि ध्यान भजना। पात्र करी मज स्वामी ॥ ४२ ॥

हीं असलीं स्तोत्रें निवडून काढून तीं कठीं धारण करण्यासाठीं प्रेमळ भक्ताच्या दृष्टीखालून हा ग्रन्थ अवश्य गेला पाहिजे. चवथ्या समासात "राम आला आला हे वार्ता" श्रवण करून

कोण तो गे आत्माराम। कोण तो गे सुखधाम।
विश्रांतीचा हि विश्राम। मदनमूर्ति दाखवी ॥ ४-४९ ॥

अशी जी सीतेच्या जीवाची धादल उडाली आहे ती निस्सीम उपासकाना च पटणार आहे.

पदरीं कन्यारत्नें असून त्यापैकीं एकाद दुसरें उजळण्याचा ज्याना प्रसंग आला असेल, अशा आईबापाना खालील उतारा चटका लागल्यावाचून राहणार नाहीं, अशी मला खात्री आहे.

करीं दुहिता मिथिळापति । जानकी निरखी भूपति ।
कन्यास्नेहाची थोर प्रीति । नेत्रोदक चालिलें ॥ १३-५१ ॥
कनकपुतळी धरूनि हातीं । राजा निरखी अयोध्यापति ।
ते समईं गोत संपत्ति । सभेसहित गहिवरे ॥ ५२ ॥
जानकीगुणें हृदय कृपण । राजा निरवितां उच्चारण ।
अष्ट वर्षें केलें म्यां पाळण । आतां तुह्मी करावें ॥ ५३ ॥
माझ्या प्राणाची प्राणकळा । सुखदायका सुसीळा ।
परम स्नेहें भूपाळा । ईचें पाळण करावें ॥ ५४ ॥
सकळ कीर्तीची गजगजा । निरोपम्य हे अवनिजा ।
ईचें पाळण रायें वोजा । बहु प्रकारें करावें ॥ ५५ ॥
कौसल्ये निरखी जनकबाळा । जळ वाहे नेत्रांजळा ।
ह्मणे माझी हे सुसीळा । पाळण तुह्मी करावें ॥ ५७ ॥
माझ्या प्राणाची आवडती । जीवनकळा हे सुमति ।
ईचें पाळण बरव्या रीति । वडिलीं केलें पाहिजे ॥ ६० ॥
राजकांता अनुक्रमें । करुणाउत्तरें उत्तमें ।
मग रघुनाथजि संभ्रमें । जनक कन्या निरखी ॥ ६१ ॥
राम अंकावरी बाळी । रायें बैसविली मैथली ।
देव दुंदुभी ते काळीं । समस्त तुरें लागलीं ॥ ६२ ॥
जानकी निरविली रामास । राजा जाला उदास ।
सर्व संग त्या समयास । रघुनाथार्पण केला ॥ ६३ ॥

आपल्या मुलीला आपण हि खालीलप्रमाणें उपदेश करावा व तिनें उभय कुलांना भूषणभूत व्हावें असें प्रत्येक बापाला वाटणार आहे.

श्रेष्ठवचनपरिपाळण । तुवां नेदावें अनुसंधान ।
रामचरणीं अनन्य । कदां वियोग नसावा ॥ १४–१००
तुजकारितां जालों मान्य । तिहीं लोकीं धन्य धन्य ।
राम जावाईत्वें पूजन । तुझेन योगें साधलें ॥ १०१ ॥

ह्मणे माझी येश कीर्ति । तां वाढविली सुमति ।
रामचरणाची प्राप्ती । तुजकारितां मज जाली ॥ १०२ ॥
पतिव्रतधर्माचे पाळणी । सर्वा श्रेष्ठ सुलक्षणी ।
आंवो कन्ये रामचरणीं । अनन्यसेवें असावें ॥ १०३ ॥

व प्रत्येक आईची दशा जानकीच्या जननीप्रमाणें च होणार आहे.

तैसी च जानकीची जननी । ह्मणे सुंदरे विळासिनी ।
कैसें असावें तुजवांचुनी । राज्य उदास जालें ॥ १०५ ॥
तुजकारितां वडिवार । थोर जाला होता विस्तार ।
तो हा समस्त जोजार । आमुचा तां वारिला ॥ १०६ ॥
आतां आह्मी उदासीन । सेविलें निरंजन वन ।
तूं सुबुद्धि मनमोहन । सहित राज्य करावें ॥ १०७ ॥
तुझेनि गुणें जालों मान्य । आमुचा वंश केला धन्य ।
आतां रामपदीं अनन्य । सेवे तत्पर असावें ॥ १०८॥

अकराव्या समासांत १८ व्या ओवीपासून तों ३६ व्या ओवीपर्यंत श्रीरामपाउलांचें जें वर्णन आलें आहे तें वारंवार प्रेमभरानें वाचावें व सीतेचा आनंद आपण हि अनुभवावा असें, पति हें च आपलें दैवत मानणाऱ्या प्रत्येक आर्यस्त्रीला वाटणार आहे.

नखीं भ्रमली ते सुंदरा । कोण करी नमस्कारा ।
मग ह्मणे रघुवीरा । न कळे महिमा मज दीना ॥ ११-३२ ॥
ह्मणे जय जय जी जगत्पति । विश्वंभरा कोदंडमूर्ति ।
कोटीच्या कोटी रतिपति । नखीं विंबोन गेले ॥ ३३ ॥
सुंदरा तूं स्वानंदघना । रामा राजीवलोचना ।
जगजीवना पुरातना । मनो वाचा ना कळसी ॥ ३४ ॥
जितुका कांहीं थोरावा । नखीं विंबला अथवा ।
जय जय जी राघवा । अपार महिमा नेणवे ॥ ३५ ॥
मना आंत वाहेरी । पाहाणें दाटलें बहुपरी ।
तुझिये कृपेनें निवारी । पाउलें दाखवीं सुंदरा ॥ ३६ ॥

असे शेकडों मनोरम प्रसंग या ग्रन्थांत आहेत, ते कोठवर आणि कसें वर्णावें !

**वाचा होये कासावीस । न ये वर्णितां ह्मणोनी ॥ ९-८३ ॥**

तेव्हां अशा ह्या ग्रन्थाची महती वर्णन करण्याच्या जास्त भरीस न पडतां तो जशाचा तसा च बंधुभगिनींच्या हवालीं करून व महाराष्ट्रांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनीं तो स्वहितार्थ भक्तिभावानें वाचावा, अशी प्रार्थना करून आपण आणखी थोडा वेळ वेणाबाईंच्या चरित्राचें चिंतन करूं.

सकाळपासून संध्याकाळपर्यंत व संध्याकाळपासून सकाळपर्यंत वेणाबाईंचा काळ कसा जात असेल बरें? श्रीसद्गुरुचरणसेवेचा त्यांना फार हव्यास असे. श्रीचरणीं कोण त्यांची अपूर्व निष्ठा असे! श्रीचरणसेवा अंतरेल ह्मणून आमरण त्या इतरत्र कोठें गेल्या नाहींत. महंतीला जाण्याविषयीं केव्हां केव्हां श्रीसमर्थांनीं त्यांना ह्मणावें, पण त्यांच्याच्यानें जाववलें नाहीं. असें असून वेणाबाईंचा शिष्यसमुदाय कांहीं लहान नव्हता असें प्रतापांत ह्मटलें आहे [ स. प्र. ११–५५ ] व आजमित्तीला हि त्यांच्या परंपरेंतील कित्येक मठ आहेत, यावरून असें अनुमान निघतें कीं, श्रीसमर्थसांनिध्यांत राहून वेणाबाई हि शिष्यांना अनुग्रह देत असाव्यात. अशा एका शिष्यावर श्रीसमर्थांच्या सांगण्यावरून त्यांनीं अनुग्रह केल्याची कथा दासविश्रामधामांत दिलेली हि आहे.

**मग बोलिले मी च ते वेणुबाई । ससांग तियेचा शिष्य तूं होईं ।**
**कृपा करील जनकजाबाई । साह्य होईल भीमराये ॥ ११९–८४**

वेणाबाई श्रीसमर्थांना सोडून कोठें गेल्या च नाहींत. त्यांचा बहुतेक काळ प्रत्यक्ष श्रीगुरुचरणसेवेंत जात असला पाहिजे. राहिलेला वेळ पोथ्या, पुस्तकें वाचण्यांत व लिहिण्यांत आणि ग्रन्थरचना करण्यांत जात असावा. संस्कृत भाषेचें हि त्यांना ज्ञान असलें पाहिजे.

सीतास्वयंवराला आपण वाल्मीकिग्रंथाचा आधार घेतला आहे असें त्यांनी ह्मटलें च आहे.

श्रीसमर्थप्रतापांत वेणाबाईच्या कांहीं कांहीं गोष्टी आल्या आहेत:

(श्री) उभे राहून कीर्तन करण्याचा अधिकार स्त्रियांमध्यें फक्त वेणाबाईस च होता. (२०-३१)

(स) श्रीसमर्थांचा त्यांच्या वर पूर्ण विश्वास होता. (१३-४७)

(द्दु) त्या महान् साक्षात्कारी होत्या. (१३-५०)

(र) एका प्रसंगीं बाहोक्षेत्रीं वेणाबाईचें वस्त्र कृष्णेच्या वाळवंटांत वाळत असलेलें पाहून श्रीसमर्थांनीं स्वहस्तें तें विभागून त्याची मेखळा करून ती अकरा दिवस धारण केली होती, हें वेणाबाईचें केवढें भाग्य होय. (११-३९)

(घे) श्रीसमर्थांपुढें दुसऱ्या कोणाचें चाललें नाहीं तर या लाड-क्या कन्येचें चाले. (१५-२)

(न) श्रीसमर्थदर्शनास येऊन कोणी कांहीं विषयांची चर्चा सुरू केली तर श्रीसमर्थांच्या आज्ञेनें कित्येक वेळां वेणाबाई च समाधानाचीं उत्तरें देत. (१८-५१,५२)

(मः) समर्थें नाना सिद्धिसामर्थ्यें विघ्नें निवारिलीं।<br>
वेणाबाईचीं अनशन तपें वर्जिलीं।<br>
आपण येऊनि निजपंगती पारणीं करविलीं।<br>
गुरुसंमदाई अंतराय वारिले॥ १९-१८॥

महाराष्ट्रधर्मस्थापनेच्या काळीं महाराष्ट्रसमाजांत ज्या स्त्रिया होऊन गेल्या त्याची योग्यता कशा प्रकारची होती, याची कल्पना वेणाबा-ईच्या चरित्रावरून होणार आहे.- अशा आमच्या वेणाबाईनीं शके १६०० च्या चैत्र वद्य १४ स आपला अवतार समाप्त केला. त्याची समाधी श्रीसज्जनगडावर मंदिराच्या बाहेर वायव्येकडील ओवरींत आहे.

वेणाबाईसी समर्थसदनीं वास करणें।<br>
समर्थसदनीं देवार्चन देवार्चनीं पूजणें।

समर्थसदनीं करावें प्रसादपारणें ।
कथाकीर्तनें करावीं समर्थसदनीं ॥
समर्थचरणीं भक्ति वेणी उत्पन्न ।
समर्थचरणीं अंतीं ऊर्ध्व पंथीं लीन ।
अधिष्ठानीं पावली संस्थान ।
चिताभूमीसी भक्ति चंपक निघाला ॥

पूर्वी जेथें चंपकवृक्ष होता तेथें आतां तुळसीवृंदावन व पादुका हीं आहेत. त्या पादुकांना हृदयांत सांठवून आपण आज विराम पावावें हें योग्य होय.

---

॥ श्रीराम ॥

# २
# उपसंहार

श्रीसीतास्वयंवराच्या आह्मांस दोन प्रती मिळाल्या, एक पोथीवजा व दुसरी शिवलेली. पोथीवजा प्रत बीड येथील मठांतील असून बहुधा श्रीगिरिधरांच्या हातची आहे व बाडवजा प्रत श्रीकल्याणस्वामींच्या डोमेगांवमठांतील असून ती श्रीकल्याणांचे शिष्य श्रीकेशवस्वामी यांनीं लिहिलेली असल्याचा स्पष्ट उल्लेख प्रतीच्या शेवटीं आहे च. प्रस्तुतचा ग्रन्थ पोथीवरून छापला आहे व बाडांतील महत्वाचीं पाठांतरें टीपांत दर्शविलीं आहेत.

श्रीसमर्थप्रतापाच्या उपसंहारांत निर्दिष्ट केलेले पुढील तीन भाग बाजूस ठेवून मध्यें च हा बारावा ग्रन्थ छापावयास घेण्याला एक कारण झालें. प्रतापाच्या प्रस्तावनेंत या ग्रन्थाविषयीं जो थोडासा गैरवपर उल्लेख आला आहे तो वाचण्यांत येऊन देवरुख येथील वकील रा. रा. जयराम विष्णु वैद्य यांनीं श्रीसीतास्वयंवर ग्रन्थ केव्हां छापणार

ह्मणून विचारणा केली. त्यावर त्यांना कळविण्यांत आलें कीं, श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमाला संपूर्ण होणें एका ह्यातींत शक्य दिसत नाहीं; इतकें आयुष्य व इतका पैसा संपादकाजवळ नाहीं. रा. वैद्य यांना अशी हि विनंति करण्यांत आली कीं, त्यांनीं च स्वतः श्रीसीतास्वयंवर ग्रन्थ संपादावा अथवा आह्मांकरवीं संपादून घ्यावा व तो श्री आत्माराम छापखान्यांत किंवा दुसऱ्या कोणत्या हि छापखान्यांत छापवावा! अशा रीतीनें पांच पन्नास सद्गृहस्थ तयार होतील तर जें काम, काल व द्रव्य यांच्या अपूर्ततेमुळें लवकर तडीस जाणें शक्य नाहीं ह्मणून मनाला उद्विग्नता वाटते, तें काम पांच पन्नासांच्या मदतीनें दहा पांच वर्षांत च सिद्ध होईल! रा. वैद्य यांना ही कल्पना पसंत पडून त्यांनीं उदारपणें द्रव्यसहाय्य करून हें काम आमच्याकडून व आमच्या च छापखान्यांत व्हावें अशी इच्छा प्रदर्शित केली. तात्पर्य, प्रस्तुतचा ग्रन्थ महाराष्ट्रास इतक्यांत च वाचावयास मिळत आहे, हे सारे रा. वैद्य यांचे उपकार होत.

या कल्पनेप्रमाणें मालेंतील पुढील ग्रन्थांपैकीं ज्याला जो आवडत असेल त्यानें तो छापवावा. तो स्वतः संपादावा व अन्यत्र छापवावा हें जास्त श्रेयस्कर; कारण तेणें करून आह्मांस आयुष्य व द्रव्य हीं दोन्हीं हि दिल्यासारखें होणार आहे. रा. वैद्य यांनीं आह्मास द्रव्यसहाय्य केलें पण आयुष्य दिलें नाहीं. आह्मास दोहोंची हि अपेक्षा आहे व ती पुरविण्याचा सोपा मार्ग ह्मणजे मालेंतील काहीं कार्यभाग सर्वस्वीं आपणाकडे घेणें हा होय. तथापि द्रव्यद्वारा मदत करून आमच्या हातून सेवा घेण्यांत आमच्यावर थोडे उपकार होतात, असें मात्र नव्हे. त्या त्या ग्रन्थाची जसजसी विक्री होईल तसतसा दुसऱ्याकडून आगाऊ मिळालेला पैसा ज्याचा त्यास परत करण्याचा सभेचा दृढ संकल्प आहे.

रा. वैद्य यांचा व आमचा पूर्वींचा मुळीं च परिचय नसतां त्यांनीं मालेवर जे हे अकारण उपकार केले त्याबद्दल आह्मी मनापासून

त्यांचें अभिनंदन करितों. त्यांच्या उपकृतीमुळें वरील कल्पना येथें नमूद करण्यास अवकाश मिळाला; व अशी आशा आहे कीं, ही कल्पना पसंत पडून, ज्यांना देवानें बुद्धि व पैसा दिला आहे, अशांपैकीं पांच पन्नास सज्जन दोहोंचा हि थोडासा उपयोग या सत्कार्याकडे करण्यास प्रवृत्त होऊन श्री रामदास आणि रामदासी ग्रन्थमाला फार च त्वरित गुंफण्याचें श्रेय संपादन करितील.

प्रस्तुतचा भाग हा एकंदर मालेंतील बारावा किंवा दुसऱ्या सराचा पहिला भाग होय. पहिल्या सरांत आठ मणि ओंवले गेले च आहेत. नववा मणि **श्रीसांप्रदायांतील कागदपत्रांचा**, दहावा **श्रीकरुणाष्टकांचा** व अकरावा **श्रीसमर्थांच्या लघुकाव्यांचा** यापुढें क्रमशः ओवले जाऊन, पहिला सर लवकर च पुरा होऊन तो श्रीसमर्थांच्या कंठीं अखंड विराजमान व्हावा, अशी उत्कट इच्छा आहे. दरम्यान श्रीदासविश्रामधामाचे बाकीचे खंड हि पुरे होतील, असा भरंसा आहे. कागदपत्रांचा भाग संपादण्यास गत वर्षीं या च सुमुहूर्तावर आरंभ केला, तें काम अजून चालू च आहे. कालचक्र सारखें फिरत राहून वर्षामागें वर्ष पटकन जातें आणि प्रतिसंवत्सरीं दसरा येतो, पण हातून काम व्हावें तितकें उरकत नाहीं, याचें मनाला वाईट वाटतें. या सबंध वर्षांत तर सांप्रदायाचें काम फार च थोडें झालें याची लाज वाटते. हें खचित ठीक नव्हे. पुढील विजया दशमीपर्यंत हातून याहून जास्त काम घ्यावें अशी प्रार्थना करून **श्रीवेणाबाईचें** हें **श्रीसीतास्वयंवर** काव्य **श्रीसमर्थचरणीं** अर्पण करितों.

धुळें
विजयादशमी शके १८३५ } शंकर श्रीकृष्ण देव



## ॥ श्रीसद्गुरुस्तवन ॥

पद

समर्थ स्वामी गुरुराया । शरण रिघालों तव पाया ।
दुस्तर भवजल उतराया । अंतर्हेतू पुरवाया ॥ ध्रु० ॥
जंबुग्रामीं अवतरला । चाफळक्षेत्रीं तो रमला ।
सज्जनदुर्गीं शोभला । संकटिं भक्तां पावला ॥ १ ॥
कृष्णावेण्यातिरवासी । सज्जनपर्वतनिवासी ।
श्रीमत् सद्गुरु उदासी । लाभे भाग्यें सर्वांसी ॥ २ ॥
भाग्य सांगों मम काई । जडली वृत्ती तव पाईं ।
अहर्निशीं मन तुज ध्याई । करुणासागर तूं येईं ॥ ३ ॥
जनांत ह्मणती दासाचा । लेश हि नसतां भक्तीचा ।
महिमा तुझिया नामाचा । अपार वर्णू मी कैंचा ॥ ४ ॥
ब्रीदें देवा सांभाळीं । भक्तालागीं तूं पाळीं ।
दुर्धर षड्रिपु निर्दाळीं । ठाव द्यावा पदकमळीं ॥ ५ ॥
जन्मोजन्मीं तव सेवा । घडवी दासा गुरुदेवा ।
तव गुणगानीं मन रमवा । स्वरुपीं अंतीं लय व्हावा ॥ ६ ॥
अंकित राम दासाचा । पालक चालक विश्वाचा ।
ह्मणउनि करुणा दिन वाचा । विनवी किंकर श्रीगुरुचा ॥७॥



# ॥ श्रीसीतास्वयंवर ॥



## समास पहिला



॥ श्रीरामकर्ता ॥

ॐ नमो जी गजानना । सकळ विद्येच्या सदना[1] ।
गौरीनंदना[2] कविजना । विद्यावैभवें वोळसी ॥ १ ॥
तरी माझे मनीची आवडी । सीतास्वंवराची गोडी ।
अर्थप्रमेयपरवडी[3] । रंग भरून द्यावा ॥ २ ॥
सीतास्वंवराच्या काजा । सिद्धलाडु गणराजा ।
पूर्णमोदक पंचखाजों[4] । तूं वऱ्हाडी आधीं ॥ ३ ॥
ऐसा पूजिला गणपती । आणीं नमिला यथामती ।
हेत धरूनिया चित्तीं । रघुनाथकथेचा ॥ ४ ॥
आतां वंदूं वेदमाता[5] । जे कार्यकर्ती सर्वसत्ता ।
जियेचे कृपेकरितां[6] । पुष्टी चढे वळें[7] ॥ ५ ॥
मंगळोत्छाव वाग्देवते । तां वदावें रसाळ कथे ।
श्रोतयावक्तयाचे माथे । आनंदें डोलवी ॥ ६ ॥
जयाचे कृपें निरावधी[8] । साधकाची कार्यसिद्धी ।
ब्रह्मांडेंसी देहबुद्धी । सांडणें सांडून टाकिलें[9] ॥ ७ ॥

१ सदन=घर. २ नंदन=पुत्र ३ प्रमेय=विषय. परवडी=प्रकार. अर्थ आणि विषय यांच्या बहुविध प्रकारांना. ४ सारिक, खोबरें, खसखस, खिसमीस व खडीसाखर अशीं पांच खाद्यें. ५ शारदा, ब्रह्मसुता. ६ डोमगावप्रतींत "करितां" ऐवजीं "कविता" असा पाठ आहे. करिता=मुळें. ७ त्वा. ८ निरवधि, विपुल. ९ पंचभूतात्मक ब्रह्मांड आणि पिंड हीं दोन्ही नाशवत अत एव त्याज्य आहेत असें ज्ञान शारदेच्या कृपेनें होऊन तीं दोन्ही हि साधकाची नष्ट झालीं.

मनबुद्धीहूनि पर । ज्या त्या होय अगोचर ।
विश्वा आंत बाहेर । विश्वाहूनि निराळा ॥ ८ ॥
येकेंपणें विराजमान । अक्षई पदाचें अधिष्ठान ।
नित्य शाश्वत निरंजन । स्वामी माझा ॥ ९ ॥
जेथें नेतिनेतीचा गजर । त्या स्वामी नमनाचा विचार ।
मी भावार्थे देहचार । येथामती बोलिलों ॥ १० ॥
आतां माझिया कुळदैवता । नमूं नमस्कार श्रीमंता ।
जो हरादिकांचा वरदाता । अनाथबंधु ॥ ११ ॥
राम गुणाचा सागरु । राम सुखाचा सुरतरु ।
राम भक्तांचें माहेरु । राम विसावा जनाचा ॥ १२ ॥
राम मनाचें मोहन । राम जीवाचें जीवन ।
राम सदां समाधान । ज्ञानियाचें ॥ १३ ॥
राम पुजावा विळासी । राम ध्यावा अहिर्णिसी ।
रामावेगळें मर्नासी । कांहीं नावडे ॥ १४ ॥
आतां श्रोतीं निरोत्तर । नेवेक होवें जी तत्पर ।
मंगळोत्छाह सैंवर । ऐका जानकीचें ॥ १५ ॥
कोण्ही येके दिवशीं । विश्वामित्र अयोध्येसी ।
राया दशरथाचे सभेसी । अकस्मात पातला ॥ १६ ॥
सभा घनवटली अपार । सूर्यवंशी ते माहावीर ।
राजा भद्रासनीं चत्वार । पुत्र पुढें वैसले ॥ १७ ॥
वसिष्ठादि महानुभाव । वैसला मंत्रीसमुदाव ।
तुरें वाजती उत्छाव । जैसी सभा इंद्राची ॥ १८ ॥

१ पलिकडचा. २ इंद्रियांना अगम्य. ३ श्रीसद्गुरुस्वरूप सर्वत्र भरलें असून सर्वांहून निराळें आहे. ४ एकमेवाद्वितीयम् ।. ५ " नेति नेति " म्हणून ज्या स्वरूपाचें वर्णन वेदांना हि झालें नाहीं. ६ श्रीवेणाबाईचे कुलदैवत आणि इष्टदैवत एकच " राम " होय. ७ अहिर्निशी, अहोरात्र. ८ " मानसीं " असा डोमगांवपाठ. ९ क्षणभर. १० दशरथ सिंहासनावर बसले होते व राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न असे चौघे पुत्र पुढें बसले होते.

पुढें विश्वामित्र ते सभे । येतां समस्त राहिले उभे ।
राजा धावें प्रेमलाभें । नमस्कार घातला ॥ १९ ॥
मुनी उठवी भूपतीतें । आशिर्वाद दे तोषेंचित्तें ।
राजा त्वरें योगियातें । वरासनीं बैसवी ॥ २० ॥
कनकपात्रीं धुतले चरण । तीर्थ वंदी जगतारण ।
पूजा करून संपूर्ण । काय बोलता जाला ॥ २१ ॥
ह्मणे धन्य माझें जीवित्व । आजी जालों कृत्यकृत्य ।
माझें भाग्य सत्य सत्य । तुज देखिलें मुनिवरा ॥ २२ ॥
तुझ्या आगमनसमया । सर्वसिद्धी मुनिवर्या ।
न धरी चित्तीं तूं कांक्षया । सीघ्र आज्ञा मज कीजे ॥ २३ ॥
मग तो तपस्वी मुनेश्वर । तोष पावोन अपार ।
ह्मणे राया तूं आज्ञाधार । भगवंतप्रियाचा ॥ २४ ॥
धन्य हे तुझी वासना । थोर पावलों समाधाना ।
ऐकोनी तुझिया वचना । नृपवरा ॥ २५ ॥
ऐक महेंद्रा दशरथा । माझिया यागाच्या पदार्था ।
पूर्ण करी मनोरथा । येक मागणें तुज ॥ २६ ॥
माझिया यागसमयासी । येते ताटिका राक्षसी ।
दुष्ट दोघा दैत्यांसी । विघ्न करी यज्ञातें ॥ २७ ॥
यागरक्षणाकारणें । राम देई उदारपणें ।
यज्ञ होतो तुझिया गुणें । आणी धर्म ही तुमचा ॥ २८ ॥
विश्वामित्राचे उत्तरीं । रायासी भेदिलें जिव्हारीं ।
जैसें वज्राचिया धारीं । हृदय विदारे ॥ २९ ॥
तनु कांपती थर्थरा । नेत्रीं लागल्या अश्रुधारा ।
कांहीं धरूनियां धीरा । राजा बोलता जाला ॥ ३० ॥

१ प्रसन्नमनानें. २ उच्च आसनावर. ३ भगवद्भक्ताचा. ४ याग=यज्ञ. ५ मारीच आणि सुबाहु अशा दोघा दुष्ट राक्षसाच्या समवेत. ६ आपणानें. ७ जिव्हार=अंतःकरण.

ह्मणे मांग स्वर्गीचें वरैवें । माग पातालीचें आघवें ।
देईन पुरुषार्थवैभवें । दिशावलयांकित हे धरा ॥ २१ ॥
श्रेष्ठ स्वामी मुनिराज । रामावेगळें माग मज ।
वज्र घेऊन सुरराज । देईन तुज सांगातें ॥ २२ ॥
यागरक्षणा प्राहिजेती । देईन दिशाचे दिग्पती ।
नवग्रह ही तुजप्रती । यागरक्षणा देतों ॥ २३ ॥
आणीक देतों मुनिराज । सूर्य आमुचा पूर्वज ।
मंडिल आणि तेजःपुंज । सर्वप्रकाशक तो नेई ॥ २४ ॥
ह्मणसी हे कैंचें तुज आधीन । तरी हे सत्य सामर्थ्यापुढें लीन ।
शुद्ध क्रियेसी बहुत मान । काये वदों मी तुजपुढें ॥ २५ ॥
विश्वामित्र ह्मणे रायासी । चाड नाहीं त्रैलोक्यासी ।
राया राम दे आह्मांसी । इतुकें चि पुरे ॥ २६ ॥
देसी ब्रह्मांडीचें सामर्थ्य । हें मी जाणतों येथार्थ ।
सत्य सूर्यवंशीं पुरुषार्थ । तुमचा ऐसा चि आहे ॥ २७ ॥
राया ऐक आतां येक । रामावेगळे अलौकिक ।
तां मज दिधले तिन्ही लोक । तरी मी नेघें सर्वथा ॥ २८ ॥
रामावेगळे देसी पदार्थ । तरी मी याचक नव्हे यथार्थ ।
कां तूं आहेसी समर्थ । ह्मणोनी राम मागतों ॥ २९ ॥
राजा भाकी काकुळती । राम नेदी पुण्यमूर्ती ।
किंबहुना लक्ष्मीपती । भीडे घालीन तुजसाठीं ॥ ३० ॥
वाचा वदली सत्य गोष्टी । मुनी घाली शकुनगांठी ।
ह्मणे नृपा मजसाठीं । देव भिडे घालावा ॥ ३१ ॥
मुनी बोलिला वचन । पुत्रलोभें तें आकैन ।
राजा भाकितसे दैन्य । काये बोलता जाला ॥ ३२ ॥

---

१ वैभव, २ सर्व, ३ वसुंधरा, पृथ्वी. ४ इंद्र. ५ सांप्रतें, सत्वर, ६ माझ्या अलौकिक आचरणामुळें मला हे सर्व वश आहेत, ७ अपूर्व. ८ घेणार नाहीं. ९ पुत्र-प्रेमामुळें मुनींच्या यथार्थ वचनाकडे दुर्लक्ष करून.

मग माझिया प्राणासी । जीव वेचीन आज्ञेसी ।
हें सत्य पुण्यराशी । राम नेदी सर्वथा ॥ ४३ ॥
प्रसन्न होऊनि मुनिवरा । मज दे अभय उत्तरा।
रामा आकुव्या लेंकुरा । काये नेसी कौशिका ॥ ४४ ॥
राम सकुमार हा पाहे । राक्षसी मारील काये ।
तुझें ही कोमळ हृदय । कैसे बोलसी मुनिवरा ॥ ४५ ॥
कौशिक ह्मणे नृपती । राम हा कोदंडमूर्ती ।
तूं नेणसी यामती । आह्मी जाणों ॥ ४६ ॥
राजा ह्मणे नेणें परी । राम नेदी[2] न धैंडीं निर्धारीं ।
आतां जाणसी तें करी । ऋषेश्वरा ॥ ४७ ॥
ह्मणोनी घाली लोटांगण । रामाकारणें हृदय कृपण ।
ह्मणे न पाहे निर्वाणें । योगिराजा ॥ ४८ ॥
विश्वामित्राचा अंतरीं । क्रोध तत्काळ प्रवेश करी ।
मग उठतां वे आवस्वेरीं । वशिष्टें बैसविला ॥ ४९ ॥
वशिष्ठ बोले रायासी । यागरक्षणधर्मासी ।
विश्वामित्राच्या वचनासी । राया राम दीजे ॥ ५० ॥
राया नव्हे हा सामान्य । जगीं कीर्ति याची धन्य ।
मुनिवचन अमान्य । करूं नये सर्वथा ॥ ५१ ॥
क्षोभलिया ऋषेश्वरा । काळ न राहे सामोरा ।
कुळक्षय नृपवरा । याचिया कोपें ॥ ५२ ॥
राया सामर्थ्यवंत मुनी । जावों नेदी रित्या वचनीं ।
तां राहावें समाधानी । राम द्यावा कौशिका ॥ ५३ ॥
मागावया ये याचक । त्यासी दवडितां निरार्थक ।
सामर्थ्य असोन कोण्हियेक । तो अधर्मी जाणावा ॥ ५४ ॥

---

१ विश्वामित्रा. २ देणार नाहीं. ३ धाडणार नाहीं. ४ अंत. ५ अवसरीं, भेटीं. ६ वशिष्ठगुरूंनी ही कशी शिकवण आहे..

वशिष्ठ बोले भूपती । तुह्मी मान्य त्रिजगतीं ।
राम नेदितां अपकीर्ति । त्रैलोकीं वाढेल ॥ ५५ ॥
सर्व धर्माचें रक्षण । राया तो हा राम जाण ।
यासः भयाचें कारण । बोलों चि नये सर्वथा ॥ ५६ ॥
आणीक असें नृपती । कार्यें जेणें येश कीर्ति ।
विश्वामित्राचे संगतीं । राम द्यावा भूपाला ॥ ५७ ॥
आतां न लवावा उशीर । मुनीस करावा नमस्कार ।
यासमागमें रघुवीर । अवश्य द्यावा ॥ ५८ ॥
वशिष्ठाच्या उत्तरीं । राजा तोष पावे परी ।
खेद दाटला अंतरीं । रामवियोगाचा ॥ ५९ ॥
राव ह्मणे वसिष्ठराजा । प्राणाचा प्राण राम माझा ।
तुह्मा उभयवर्गवचनकाजा । हो आतां भलें ॥ ६० ॥
शत्रुघ्नेसी मुनिवरा । न्यावें भरत कुमरा ।
कौशिक वदे नृपवरा । कार्य होणार नाहीं ॥ ६१ ॥
विश्वामित्र बोले रायासी । तुज मानेल तो दे आह्मांसी ।
याग पावे सिद्धीसी । ऐसें केलें पाहिजे ॥ ६२ ॥
रायें दिधलें भरता । पुष्ठीसीं शत्रुघ्न भ्राता ।
मुनी निघाला निजपंथा । पुरी वोलांडिली ॥ ६३ ॥
भरतासी बोले मुनी । जवळी पंथें आतां जाउनी ।
परंतु राक्षसी या रानीं । घोर आहे भरता ॥ ६४ ॥
आकाशीं लागलें आवाळें । वोठ भूमीवरी लोळे ।
तुह्मी धाकुटीं बाळें । काये करावें आतां ॥ ६५ ॥
भरत वदे मुनिदेवें । राक्षसीमार्गें नवजावें ।
दूरी पंथें चालावें । सावकाश समर्थें ॥ ६६ ॥
मुनी फिरे सत्वरें । रायासी बोले निकुरें ।
ह्मणे आपुलीं लेंकुरें । सांभाळी राया ॥ ६७ ॥

१ जाऊं नये. २ निश्चयानें.

ऐक राया वचन । काये बहु आतां बोलेन ।
राम देतोस कीं अमान्य । मज केलें भूपती ॥ ६८ ॥
राजा वचन न बोले । वशिष्ठें मुखाकडे पाहिलें ।
ह्मणे मुनीचें समाधान केलें । पाहिजे राया ॥ ६९ ॥
देवाधिदेवचूडामणी । तो हा राम कोदंडपाणी ।
नसत्या भयाची कडसणी । यासी कां तूं लाविसी ॥ ७० ॥
अमरीं पुजावें जयासी । तो हा राम लावण्यरासी ।
धर्मरक्षणकार्यासी । लीला अवतरे ॥ ७१ ॥
रामाचिया पुत्रत्वपणें । तुझिया भाग्यासी नाहीं उणें ।
मुनिवचना या कारणें । पाळणें धर्म ॥ ७२ ॥
राजा वदे वशिष्ठासी । मानलें तुझिया मनासी ।
तरी सेनाप्रधानेसी । राम द्यावा मुनिवरा ॥ ७३ ॥
वसिष्ठ बोले मुनिवरा । राजा बोललिया उत्तरा ।
तुह्मीं द्यावें मत्योत्तरा । मानेल तैसें ॥ ७४ ॥
विश्वामित्र ह्मणे रायासी । काज नाहीं सेनेसी ।
राया राम दे आह्मासी । इतुकें चि पुरें ॥ ७५ ॥
राजा ह्मणे मुनिवरा । रामा सुंदरा सकुमारा ।
पायीं चालतां हे धरा । खुपेल कीं स्वामी ॥ ७६ ॥
रविकिरणें तेजंकरी । उष्ण वैसेल तनुवरी ।
सुंदर मूर्ती श्रमंकरी । कोमेजेल मुनिवरा ॥ ७७ ॥
मुनी बोले महेंद्रा । पदार्थवेथा रामचंद्रा ।
न लागेत नरेंद्रा । यासी आह्मी जाणों ॥ ७८ ॥
राम आलंगून नृपती । मस्तक अवघ्राणी भूपती ।
ह्मणे कल्याण हो कल्याणमूर्ती । राणवसां पुसावें ॥ ७९ ॥

---

१. चूडामणी=शिरोरत्न. २ विचार. ३ देवांनीं. ४ अखर. ५ "मुख" पाठांतर. ६ पंचभूतांपासून होणारा त्रास. ७ राणिवसां, अंतःपुरांतील राण्यांना.

राम लावण्याचा सागर । सर्वभूषणीं मनोहर ।
पाठीसी चाले फणीवर । मातृभुवना आले ॥ ८० ॥
जेथें अष्टमहासिद्धींच्या कामाऱ्या । कल्पतरूच्या वोवरिया ।
चिंतामणीच्या पाइऱ्या । तेजःपुंज भुवन तें ॥ ८१ ॥
वरी रत्नांचे मंडप । खचितस्तंभ तेजःपुंज ।
मुक्तचांदवे अमूप । परम शोभायमान ॥ ८२ ॥
चित्र विचित्र मणिघोस । मुक्तें लोंबती बहुवस ।
मंगळराज जगदीश । नांदतें गृह जयाचें ॥ ८३ ॥
ते मंदिरीं रामजननी । शोभे दिव्य सिंहासनीं ।
च्यामरें वीजिणे विळासनी । नाना उपचार जाणविती ॥८४॥
तें सुखाचें मंदिर । प्रवेशला भुवनसुंदर ।
सौमित्रेसी रघुवीर । मातृदर्शना आले ॥ ८५ ॥
नमस्कारिली निजजननी । उभा राहिला च्यापपाणी ।
वदे माते ये क्षणीं । आज्ञा दिल्ही पाहिजे ॥ ८६ ॥
मुख न्याहाळी सुंदरा । पंकजनयना मनोहरा ।
प्राणाच्या प्राणा रघुवीरा । माझ्या कोठें जातोसी ॥ ८७ ॥
सुंदर बोले सुंदर वचन । यागरक्षणालागून ।
सभे रायासी मागोन । कौशिकें आज्ञा घेतली ॥ ८८ ॥
जीवलोण जगजीवना । उतरी कौसल्या नंदना ।
म्हणे माझ्या आनंदवर्धना । काय जालें त्या कौशिका ॥८९॥
रायासीं मागावी संपत्ती । अमित्य सेना न्यावी होती ।
ऋषीचे भीडे भूपती । काय केलें ॥ ९० ॥
वसिष्ठादिकीं ही सभेस । अनुमोदिलें ये गोष्टीस ।
काय केलें विचारास । तुज यागरक्षणा ॥ ९१ ॥

१ लक्ष्मण. २ डोमगांवप्रतींत "च्या" नाहीं. ३ कामारें= सेवक. ४ "उपऱ्या" पाठांतर. वोवरिया=ओवऱ्या. उपरी=माडी. ५ मोत्यांचे छत. ६ चौरी. ७ पंखे ८ पंकज=कमल. ९ अपरिमित.

काय जाल्या त्यांच्या बुद्धी । कैंची मांडिली उपाधी ।
माझ्या सुंदरा गुणनिधी । कैसा धाडूं आश्रमा ॥ ९२ ॥
पाहातां रूपाचें त्रस्वेंपण । कोटी मदनाचें निंबलोण ।
मी वोवाळीन आपुले प्राण । दृष्टी घाली सुंदरा ॥ ९३ ॥
अंकीं पुत्र राजकांता । सिंहासनीं विराजतां ।
पाचारून पुरोहिता । वशिष्ठासी बोलती ॥ ९४ ॥
वैसा मुनी वरासनीं । नमस्कारी रामजननी ।
ह्मणे सभे समाधानी । राव कैसा वैसला ॥ ९५ ॥
कौशिकाचिया यागासी । काय उणें होतें द्यावयासी ।
संपत्ती सेना रायापाशीं । दुजी तुळणा नसे ॥ ९६ ॥
नव्याणौ सहस्राशेवटीं । पुत्रमुख पाहिलें दृष्टी ।
रायासी आठवेना कां गोष्टी । राम आश्रमा धाडितां ॥९७॥
आणी तुह्मी पुरोहितीं । विचार सांगावा वरव्या रीतीं ।
मुनी तोष पावे चित्तीं । आणी राम ने दावा ॥ ९८ ॥
कोटीच्या कोटी यागरचना । मुनी करूं द्या धन सेना ।
आजि रायाच्या वैभवमाना । काय उणें असे ॥ ९९ ॥
राम नेदी न धडी आश्रमा । ह्मणोनि पाचारिलें तुह्मां ।
नमस्कारी ह्मणे क्षमा । हे गोष्टी करावी ॥ १०० ॥
कौशिकाचें समाधान । वहुतां प्रकारें करून ।
सर्वस्व हें राज्यदान । त्याच्या पायीं करा हो ॥ १ ॥
रामावेगळे ध्या सर्वांसी । ऋषी तोषवा मानसीं ।
वरव्या प्रकारें कौशिकासी । प्राण आह्मी समर्पूं ॥ २ ॥
वशिष्ठ ह्मणे राजप्रिये । राजा वोलिला हे उपाय ।
धन सेना किती काय । पदार्थ मुनी ने घे ॥ ३ ॥
पुढें असे कार्य थोर । रामविवाहाचा गजर ।
यश कीर्ती जयजयकार । सून मांडिये वेसी ॥ ४ ॥

हे उछाहाचे दिन । राम भेणील आजिपासून ।
नव्हे अन्यथा वचन । राजकांते ॥ ५ ॥
आतां मंगल आरती । राम वोवाळी वरव्या रीती ।
मंगळ आशिर्वाद अक्षतां । मस्तकातें शोभवीं ॥ ६ ॥
आतां वेळ न लवावा । राम या मुहूर्ते जावा ।
तां शकुनलाडू बांधावा । याचा पदरीं ॥ ७ ॥
कौसल्या तोष पावोनी । ह्मणे बोलिलासी मुनी ।
थोर पावले समाधानी । तूं मस्तकीं आमुच्या ॥ ८ ॥
तूं आमुचें कल्याणकर्ता । विश्रांतीस पावविता ।
रामप्राप्ती तुजकरितां । तूं आमुचा साभिमानी ॥ ९ ॥
अवश्य ह्मणे मुनिवरा । संभ्रमें कौसल्या कुमरा ।
नाना उपचारें सुंदरा । रत्नताटें मांडिलीं ॥ ११० ॥
षड्रसें धानोवंतें । अपूपें नामें अमितें ।
पंचामृतें विराजितें । रत्नवाट्या लखलखिती ॥ ११ ॥
ह्मणे जेवी रघुनंदना । माझिया जीवाच्या जीवना ।
सुंदरमूर्ती स्वानंदघना । आपूशन करावें ॥ १२ ॥
सुंदरमूर्ती आपूशन । करून सौमित्रानंदन ।
विळासधामाचें भोजन । नाना विळासें होतसे ॥ १३ ॥
कुरळ रुळती पृष्ठीवरी । मुद्रिका साजिऱ्या करीं ।
सांवळी मूर्ती पीतांबरधारी । मनोहर विराजे ॥ १४ ॥
जालें तृप्तांचें जेवण । शुद्धोदकें आचमन ।
सुंदरमूर्ती शोभायमान । तांबोल्यउपचार जाले ॥ १५ ॥
आपादपर्यंत सुमनमाळा । सौमित्रेसीं घननीळा ।
माते कौसल्ये सोहळा । पंचप्राणें वोवाळी ॥ १६ ॥

---

१ वरील. २ या शब्दाचा बरोबर अर्थ समजत नाहीं. "धाना" म्हणून एक प्रकारचें धान्य आहे. डोमगांवप्रतींत "धा" चा "ना" केला आहे. ३ अनरसे. ४ आपोशन. ५ लक्ष्मण.

सकळ माता संभ्रमानें । कर्पुराचीं नीरांजनें ।
कनकताटीं नाना रत्नें । रामरत्ना वोवाळिती ॥ १७ ॥
मंगलनिधी स्वानंदघना । सौमित्रेंसीं रघुनंदना ।
देती आशिर्वादवचना । जयो पावे सर्वदां ॥ १८ ॥
पुढिलिये समासीं अनुसंधान । याग होईल शोभायमान ।
वेणीस्वामी रघुनंदन । ताटिका मारिती उछाह ॥११९॥

इति श्री रामायणे आदिकांडे सीतासैंवर नाम । समास प्रथम ॥१॥

---

## ॥ समास दुसरा ॥

॥ श्रीरामकर्ता ॥

जो जाणता सर्व विधीसी । कदां न चुके नीतीसी ।
घेऊनि मातृआज्ञेसीं । सभामंडपा आला ॥ १ ॥
सुंदरमूर्ती शोभायमान । देखोन सभा तटस्त जन ।
कोदंडधारी विराजमान । रायापुढें शोभले ॥ २ ॥
पुढें विश्वामित्र रायासी । ह्मणे धन्य तूं पुण्यरासी ।
उपमा नाहीं तुझिया भाग्यासी । रामपुत्रत्वपणें ॥ ३ ॥
वसिष्ठासारिखा योगेश्वर । तुझा गृहीं निरंतर ।
विश्रांती पावलों थोर । आज्ञा देई मज आतां ॥ ४ ॥
नाना उपचारीं पुजून । मुनी पावला समाधान ।
समागमें रामरत्न । थोर संभ्रमें निघाला ॥ ५ ॥
संतुष्ट जाल्यां मुनिवरा । राजा करी नमस्कारा ।
ह्मणे रामा सुंदरा । येत्न करी कौशिका ॥ ६ ॥
ऋषी बोले वचन । राम आमुचें जीवन ।
यासी विसरतां गहन । दुःख भोगणें लागेल ॥ ७ ॥

परस्परें वचनं विराजे । रायां गहिंवरें गजगजे ।
कोदंडमूर्ती मंगलराज । तापसी घेऊन निघाला ॥ ८ ॥
पुढें शोभतो तापसी । पाठीसी राम लावण्यरासी ।
च्यामरें ढाळी संभ्रमेसी । शेष समीप चालतसे ॥ ९ ॥
पुढें भाते कनकवाणें । खचित च्यापें सुलक्षणें ।
दोन्ही मूर्तींचें वरवेपण । अयोध्या पाहों ठाकली ॥ १० ॥
ते समईचा घोष माहा । कौसल्येचा राम पेहा ।
सजे गोपुरें दाटी तेव्हां । दुर्गीं दुर्भागीं जनांची ॥ ११ ॥
पुरवासिनी सुंदरा । आरत्या घेऊनि नागरा ।
वोवाळिती रघुवीरा । सौमित्रेसी ते काळीं ॥ १२ ॥
ग्रामगर्भीं चालतां । सुवासिनी मंगलमंडिता ।
निंबलोण उतरितां । ठाई ठाई थोकती ॥ १३ ॥
किती घेती ईडपिडे । किती पाहाती निवाडें ।
किती बोलती वचनें जाडें । धन्य धन्य कौसल्या ॥ १४ ॥
कौसल्यानंदवर्धना । पाहाती पुरीच्या अंगनां ।
खचितपात्रीं पुष्पें नाना । फळें शकुना आणिलीं ॥ १५ ॥
माहा संभ्रमें करूनी । बोळंडिली राजधानी ।
कोदंडमूर्ती घेऊनी । कौशिक पुढें चालिला ॥ १६ ॥
सर्व राजपुत्र शोभती । मुनितोष न माये चित्तीं ।
येकी क्रमूनियां वस्ती । कामाश्रमीं दुसरी ॥ १७ ॥
पुढें लागलें घोर वनें । शाळ ताळ निबिड वन ।
कौशिक ह्मणे हें वन । ताटिकेचें राघवा ॥ १८ ॥

---

१ लक्ष्मण. २ ते समईचा घोष माहा । कौसल्येचा राम पेहा ॥ ह्या दोन चरणांचा घोष करण्यांत एकाद्याला प्रसन्नता वाटावी, अशीं हीं गोड चरणें आहेत. ३ किल्ल्यावर. ४ दुतर्फा. ५ चांगल्या. ६ गांवामधून. ७ कौसल्येचा आनंद वाढविणाऱ्या रामाला. ८ क्रिया. ९ "गहन" पाठांतर. १० शाल ह्मणून वृक्षजाती आहे. ११ ताळ हि वृक्षजाती च आहे. आपण ताड ह्मणतो.

मरीच सुबाहु पुत्रेंसीं । येथें आहे ते राक्षसी ।
मळकुशळ देशासी । वसों नेदी सर्वथा ॥ १९ ॥
तरी ये समई माहावीरा । ताटिका वधी कोदंडधरा ।
च्यापपाणी सीतावरा । जयो पाव ये काळीं ॥ २० ॥
कांक्षा धरिसी स्त्रीवधाची । तरी हे पीडक त्रैलोक्याची ।
ईचिया वधांतां धर्माची । अभिवृद्धी वाढेल ॥ २१ ॥
धर्मस्थापका रविकुळटिळका । ताटिका मारीं रघुनायका ।
मंगळकीर्तीचा घोष निका । त्रैलोकीं त्रीद गार्जो दे ॥२२॥
माहावीर सीतारमण । वदे आज्ञा हे प्रमाण ।
धनुष्य टणत्कारूनि बाण । चंद्राकार काढिला ॥ २३ ॥
धनुष्यटणत्काराचा घोष । अद्भुत दाटला कर्कश ।
नादें उंतटलें आकाश । ताटिका ऐकोनि धाविली ॥ २४ ॥
अका सहस्राची गजमाळा । कंठीं घातली अवलीळा ।
सिंह्य शार्दूल कर्णविळा । कुंडलें वोविलीं ॥ २५ ॥
ताडप्रमाण विशाळ । दंत दाढा विसाळ ।
शरीर अत्यंत चि स्थूळ । घोररूपी धांविली ॥ २६ ॥
धांविनली त्या अवसरा । हाक फोडिली माहा घोरा ।
ऊर्धवाहु निशाचरा । राम सौमित्र देखोनि ॥ २७ ॥
तेव तो वीरबाहो सुलक्षण । अभंग तें वज्रठाण ।
चंद्रार्क सोडिला बाण । ताटिकाहृदय फोडिलें ॥ २८ ॥
ताटिकेचा गेला प्राण । पाताळीं सुस्नात बाण ।
रामभाता सुलक्षण । हंसरूपें प्रवेशला ॥ २९ ॥
जयजयकारें स्वर्गवासी । विमानें दाटलीं आकाशीं ।
दुंदुभी लागल्या आकांशीं । पुष्पवृष्टी होतसे ॥ ३० ॥

---

१ मळ आणि कोशल असे दोन देश २ न हि ते स्त्रीवधकृते घृणा कार्या नरोत्तम । चातुर्वर्ण्यहितार्थं हि कर्तव्यं राजसूनुना ॥ वाल्मीकिप्रणीत बालकाण्ड २५।१७. ३ चांगला. ४ फाटलें. ५ गज=हत्ती. ६ सहज. ७ वाघ. ८ "परिमाण" पाठांतर. ९ मोठाल्या. १० राक्षसी. ११ "चंद्रार्ध" पाठांतर. १२ "विळासी" पाठांतर.

तें समई देव स्तुती । उछाह गाजे त्रिजगतीं ।
थोर संभ्रमें कोदंडमूर्ती । कौशिकें आश्रमा आणिलें ॥३१॥
मुनी पावे सिद्धाश्रम । समागमें पूर्णकाम ।
मनोरथाचा नेम । फळश्रुतीस आला ॥ ३२ ॥
ते आश्रमीं अपार । ऋषी ब्राह्मण नामधार ।
राम सौमित्र माहा वीर । देखोनि आनंद सर्वांसी ॥ ३३ ॥
वरासनीं सन्मान । सौमित्रेसी रघुनंदन ।
कौशिकें उपचारें पूजन । भक्तपतीचें केलें ॥ ३४ ॥
ऋषी ब्राह्मण तपोधन । तयामध्यें विराजमान ।
सौमित्रेंसी रघुनंदन । परम शोभिता जाला ॥ ३५ ॥
ब्राह्मण सांगती रघुवीरा । मरीचसुबाहूनें दरारा ।
लाविलाहे कोदंडधरा । सदा सर्वदा येताती ॥ ३६ ॥
भक्तवछळ जगत्पती । काये वदे मुनीप्रती ।
निर्भय तुह्मी शीघ्रगती । मखं आरंभ करावा ॥ ३७ ॥
च्याप सज्जून कोदंडपाणी । उभा राहिला वज्रठाणीं ।
पाठीसी वीरचूडामणी । सौमित्र शोभतां जाला ॥ ३८ ॥
ऋषीब्राह्मणासहित । विश्वामित्र आनंदभरित ।
याग मांडिला अद्भुत । कंकण कौशिकें बांधिलें ॥ ३९ ॥
याग मांडला बरव्या रीती । साहा दिवस साहा राती ।
क्रमलीयां कोदंडमूर्ती । वज्रठाणीं उभा असे ॥ ४० ॥
स्वाहा स्वधा या स्वरेंसी । धूम्र चालिला आकाशीं ।
तें देखोन त्वरेंसी । मरीच सुबाहु धांविले ॥ ४१ ॥
तों सुटला झुंझार्ट वारा । रक्तबुंद येती सैरा ।
देखते जाले निशाचरा । यज्ञवाटिका गजबजली ॥ ४२ ॥

---

१ यज्ञ. २ चूडामणि=शिरोरत्न, श्रेष्ठ. ३ "सा" पाठांतर ४ जोराचा. ५ "रक्तबिंदें" पाठांतर, राक्षस.

ह्मणती मरीच सुबाहो। आले आले हे पाहो।
ब्राह्मण बोलती वीरबाहो। रामा राखे आह्मांसी॥ ४३॥
सौमित्रेंसी रघुवीर। भार ठाणें उभा धीर।
तया पाठीसी ऋषीवर। अपार ब्राह्मण निघाले॥ ४४॥
राम वीरचूडामणी। दोनी बाण लाविले गुणीं।
वोढी काढूनि आकर्णीं। धगधगीत सोडिले॥ ४५॥
अग्नीअस्त्रबाण कल्लोळ। सुबाहु जाळिला तत्काळ।
वायव्यास्त्रबाणें अंतराळ। मरीच आकाशीं उठविला॥४६॥
बाणपिसोऱ्या लागल्या दैत्य। शत योजनपर्यंत।
भोवंडिला अकस्मात। समुद्रतीरीं टाकिला॥ ४७॥
देवीं दाटलीं विमानें। कौतुक पाहाती आश्चिर्यानें।
सौमित्रें शरसंधानें। राक्षसी सेना मारिली॥ ४८॥
जयो राघवा जयजयकार। पुष्पें वर्षती सुरवर।
देवस्तुतीचा गजर। नाच गायनें रंभांचीं॥ ४९॥
कौशिका आनंद गहन। रामा दिल्हें आलिंगन।
अद्भुत स्तुतीनें पूजन। रघुवंशजाचें केलें॥ ५०॥
ऋषी ब्राह्मण सकळिक। स्तुती प्रवर्तले अनेक।
तोष पावला कौशिक। याग संपूर्ण जाला॥ ५१॥
अग्रपूजा रघुवीरा। पूजी सौमित्राकुमरा।
अनुक्रमें द्विजवरा। ऋपेश्वरां पूजिलें॥ ५२॥
ऋषी ब्राह्मण तापसी। भोजन राम पंगतीसी।
सारूनियां विळासी। सुखचर्चे बैसले॥ ५३॥
याग जाल्या विराजमान। सौमित्रेंसी रघुनंदन।
कौशिकाश्रमीं शोभायमान। तीन दिवस क्रमिले॥ ५४॥
आतां पुढिलीये समासीं। राम जाती मिथिळेसी।
वेणी ह्मणे श्रोतयांसी। कथासारस तो ऐका॥ ५५॥
इति श्री रामायणे आदिकांडे। सीतास्वैंवर समास द्वितीय॥ २॥ ७॥

## ॥ समास तिसरा ॥

॥ श्रीरामकर्ता ॥

तंव जनकाचे मुळहारी[1] । आले आश्रमा ते अवसरीं ।
नमूनि कौशिकाचा करीं । पत्रिका दिधली ॥ १ ॥
ह्मणती पाचारिलें तुह्मां । जानकीविवाहसंभ्रमा ।
पाहावया मुनिसत्तमा[2] । सीघ्र आलें पाहिजे ॥ २ ॥
माहा बळिये पराक्रमी । जितुके पुरुषार्थी विक्रमी ।
राजे नवाजिक नामी[3] । मिथिळेश्वरें[4] आणिले ॥ ३ ॥
हें पुरुषार्थाचें सैंवर । च्याप टाकिलें आहे दुस्तर ।
जानकीप्राप्तीचा विचार । धनुष्याआड राहिला ॥ ४ ॥
तरी चालावें जी सत्वर । आतां न लवावा उसीर ।
मंगळोछाव असती थोर । परंतु ऐसा न दिसे ॥ ५ ॥
विश्वामित्र ह्मणे रामा । पाहावया योग्य सैंवर तुह्मां ।
कोण राजे बळसीमा । स्वभावें चि तुळती ॥ ६ ॥
तुह्मी राजे सूर्यवंशी । प्रतापी पुरुषार्थाच्या रासी ।
जोडा नाहीं विक्रमासी । कौतुक दृष्टी पाहावें ॥ ७ ॥
सौमित्रेंसी रघुनाथा । समागमें यावें आतां ।
तूं जिंकिसील आतां[5] । येथें[6] संशयो नाहीं ॥ ८ ॥
ब्राह्मणाचें वचन । पाळक ब्रीद पुरातन ।
सौमित्रेंसी रघुनंदन । ऋषीमेळें चालिले ॥ ९ ॥
राम विश्वामित्र मुनीसी । असंख्य चालिले तापसी ।
इति[7] महानुभाव योगाभ्यासी । समागमें चालिले ॥ १० ॥
परमहंस वीतरागी । निस्पृह आणी संगत्यागी ।
गोमुखे[8] अणी वैरागी । अपार सवें चालिले ॥ ११ ॥

१ मूळ पाठविलेले पुरुष. २ मुनिवर्या. ३ नामांकित. ४ जनकानें. ५ "तूं जिंकिसी सर्वथा ।" पाठांतर. ६ डोमगांव प्रतींत "येथे" खोडून "येदर्था" केलें आहे. ७ यति. ८ हात न लावतां गाईप्रमाणें तोंडानें अनपाणी घेणारे तपस्वी.

फळाहारी पर्णाहारी । तृणाहारी निराहारी ।
दुग्धाहारी ब्रह्मच्यारी । समागमें चालिले ॥ १२ ॥
टाळ मृदांग उपांग श्रुती । विणे वाद्यें नेणों किती ।
माहागुणी भव्यमूर्ती । हरिदास सर्वे चालिले ॥ १३ ॥
गर्गाच्यार्या जोतिसी । घटित पाहोन संभ्रमेंसी ।
घटिका घेऊन त्वरेंसी । समागमें चालिला ॥ १४ ॥
चालिली ब्राह्मणाचीं थाटें । विद्यापात्रें तीं अचाटें ।
ज्यांचीं तपें उत्कटें । अपर सूर्य चालिले ॥ १५ ॥
संत महंत मुनेश्वर । योगी चालिले अपार ।
राम जिंकील हा निर्धार । तो संभ्रम पाहावया ॥ १६ ॥
दोनी मध्यें कोदंडमूर्ती । वेष्टित तापस चालती ।
सुखी जाल्या चित्तोवृत्ती । आनंदमूर्ती पाहातां ॥ १७ ॥
चर्चा करिती परस्परें । रामगुणाचीं अक्षरें ।
उच्चारितां जयजयकारें । मुरकुडी बोलती ॥ १८ ॥
येक श्रुतीचा भावगर्भ । अर्थ काढिती स्वयंभ ।
येक शास्त्रज्ञ वालंब । नाना चर्चा करिती ॥ १९ ॥
वर्णावे ते कोण्या गुणें । पाठ साहीं दर्शनें ।
येका चहु वेदीचीं ज्ञानें । येका पुराणें मुखोद्गत ॥ २० ॥
ऐसे चालिले सुखरासी । तेथें काय उणें चर्चेसी ।
जे वदते वाचेसी । नेमस्त सांगून देते ॥ २१ ॥
येक केवळ निश्चई । संत मूर्ती संख्या नाहीं ।
ब्रह्मानंद ते समई । कोण आश्चिर्य होतसे ॥ २२ ॥
प्रसंग अन्वय राखते । थोर धारणेचे लोक ते ।
ऐसे श्रोते आणि वक्ते । उपमेवेगळे चालिले ॥ २३ ॥

---

१ वरील पान्न सहा ओव्या लिहित असतां श्री वेणाबाईंना दासबोध ३४९ आठवला होता असें दिसतें. २ "भरल्या" पाठांतर. ३ पालभ=आवड. ४ न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा आणि वेदांत अशीं हीं सहा दर्शनें आहेत.

भक्त उपासक तेजपुंज । सुखसमयाचीं गजगज ।
सौमित्रेंसी वरदराज । मध्य मंडळी चालतसे ॥ २४ ॥
तंव तो पुढें विराजमान । आश्रम देखती निविड वन ।
तरु फळीं शोभायमान । नाना पुष्पें दाटला ॥ २५ ॥
परम रमणीय तें स्थळ । जळें वाहाती निर्मळ ।
वापी सरोवरें विशाळ । उचंबळती जीवनें ॥ २६ ॥
पक्षी स्वापदें आदिकरूनी । जीवमात्र नाहीं ये वनीं ।
अति आश्चिर्य करूनी । राम पुसे कौशिका ॥ २७ ॥
परम रमणीय विचित्र । शोभवी स्थळ हें पवित्र ।
पक्षी स्वापदें जीवमात्र । नांडळे आश्रम कोणाचा ॥ २८ ॥
कौशिक वदे रघुनाथा । गौतमआश्रम हा समर्था ।
अहिल्याशापाची कथा । समर्था निवेदन केली ॥ २९ ॥
गौतमें शापिलें अहिलेसी । सीळा होऊन पडली आश्रमासी।
कृपा येउनी ब्राह्मणासी । मागुता उश्शाप दिधला ॥ ३० ॥
भक्तवछळ रघुनंदन । दीनबंधु पतितपावन ।
या मार्गें जातां विराजमान । चरणस्पर्शें उद्धरसी ॥ ३१ ॥
दोषें स्पर्शिलें हें स्थळ । गौतमें त्यागिलें तत्काळ ।
पक्षी स्वापदें जीव सकळ । आश्रम सांडून गेलीं ॥ ३२ ॥
तरी ये समई पुरुषोत्तमा । आहिल्या उद्धरी रघोत्तमा ।
चरणप्रतापाचा महिमा । कीर्तिं त्रैलोकीं गाजों दे ॥ ३३ ॥
अहिल्येचा उद्धार । कर्ता तूं येक जगदेश्वर ।
गौतमवचनाचा वडिवार । भक्तपती तूं वाढवी ॥ ३४ ॥
गौतमाचेनि शापें । अहिल्या सती सीळारूपें ।
पडली होती थोर पापें । त्या आश्रमासेजारी ॥ ३५ ॥
दीनबंधु पतितपावन । गौतमआश्रम पाहोन ।
शापसीळेसी वामचरण । आवचितां चि स्पर्शला ॥ ३६ ॥

१ आटजत नाहीं. २ "आश्रमापासीं" पाठांतर. ३ मोठेपणा ४ डावा पाय.

तत्काळ उद्धार गोरटी । रामचरणीं घाली मिठी ।
ह्मणे जय जय जी जगजेठी । बहुत दिवस कष्टले ॥ ३७ ॥
स्त्रीदेहाचा समंधु । भोगीत होतें अपराधु ।
मजकारणें दीनबंधु । कोणेकडून आलासी ॥ ३८ ॥[1]
चौ खाणीवेगळा । देहे धरिला होता सोंळा ।
मजकारणें दीनदयाळा । अरण्य शोधीत आलासी ॥ ३९ ॥
अवघ्याहून नीच यातना । जेथें उपाये चि चालेना ।
ते संकटींहूनि पावना । मातें मुक्त केलें ॥ ४० ॥
मज पाषाणाचें अंतर । जाणोनि केला उद्धार ।
सर्वज्ञ नामाचा वडिवार । प्रचीतीसी मज आला ॥ ४१ ॥
रविवंशजा रघुनंदना । जन्मोजन्मीं उपासना ।
तुझें चि ध्यान भजना । पात्र करी मज स्वामी ॥ ४२ ॥
दीनबंधु सुखरासी । वर दिल्हा अहिलेसी ।
भक्तपती त्या समयासी । सुरीं[2] पुष्पवर्षाव केला ॥ ४३ ॥
अहिलेसी उद्धार जाला । देवीं पुष्पवर्षाव केला ।
अवघा जयजयकार दाटला । गौतम आला ते काळीं ॥४४॥
शतानंद अहिल्याकुमर । तो हि पातला सत्वर ।
ह्मणे रामा सत्योत्तर । माझ्या पित्याचें तां केलें ॥ ४५ ॥[3]
माझी माता अहिल्या सती । चिरकाळ दुख भोगीत होती ।
तुंवा उद्धरिली जगत्पती । थोर संतोषी मी जालों ॥ ४६ ॥
गौतमें स्तुति करून । ह्मणे जय जय जी पतितपावन ।
गेल्या गृहस्थाश्रमा देऊन । मज सुखी तां केलें ॥ ४७ ॥
मग तो दीनबंधु श्रीराम । फळकल्पतरु पूर्णकाम ।
गौतमा देऊन गृहस्थाश्रम । अति सत्वर चालिले ॥ ४८ ॥

---

१ वरील पांच सहा ओव्यांत अहल्येनें केलेली स्तुति पाठ करण्यासारखी आहे. २ देवानीं. ३ माझ्या पित्याचें वचन आपण खरें केलें.

गंगाअवताराची कथा । आणि कौशिकाच्या पुरुषार्था ।
शतानंदें समर्था- । पदीं निवेदन केलें ॥ ४९ ॥
तों पुढें मिथिळा देखती । नेणों जैसी अमरावती ।
पताका तोरणें झळकती । जाळांधेरें मुक्तांचीं ॥ ५० ॥
कोट बुरुज सुवर्णाचे । खचित नाना रत्नाचे ।
जे स्वर्गींच्या देवाचे । माथे डोलविती ॥ ५१ ॥
पुरीरचना कनकमणी । नेणों उघडली तेजोखाणी ।
आणी सूर्याचा किरणीं । दीप्तीं नेत्र भांबावती ॥ ५२ ॥
परम रमणीयें स्थळें । पुरीबाहेरी विशाळें ।
वापी तळीं निर्मळें । परिघ पाट कालवे ॥ ५३ ॥
आँगर बागा नाहीं निती । मुधाफळानें वोळती ।
नेणों इंद्राची अमरावती । सुखें येऊन राहिली ॥ ५४ ॥
भोंवते उतरले राजे । असंभाव्य सेना गाजे ।
मंगळ तुरें येक सेजे । पुरीआंतबाहेरी ॥ ५५ ॥
दमामे दणदणिती गाढे । तुतारे नगारे चहुंकडे ।
कर्णे नफेऱ्या हत्ती घोडे । तयावरून वाजती ॥ ५६ ॥
केशरकस्तुरीचे सडे । मुक्तारांगोळ्या चहुंकडे ।
मंडपीं नाच जिकडे तिकडे । परिमळ धुशर उधळंती ॥५७॥
तें आश्चिर्याचें स्थळ । मुनी पाहाती सकळ ।
तव ते वार्तिक सँकळ । राया मात जाणविती ॥ ५८ ॥
विश्वामित्राचे मुव्हारी । राया सांगती अवधारी ।
कौशिक आला मुनिवरी । आणि राम दाशरथी ॥ ५९ ॥
राम ऐसें पडतां कानीं । जनक संतोषला मनीं ।
ह्मणे माझीये नंदनी । लागीं ते पात्र होये ॥ ६० ॥

---

१ नंतर शतानंदांनीं गंगा नदीची उत्पत्ति व विश्वामित्राचें चरित्र हीं श्री-रामाला सांगितलीं. २ जाळीच्या खिडक्या वगैरे. ३ आगर=शेतमळा. ४ दोन्ही प्रतींत असा च पाठ आहे. पण मिती पाहिजे असें वाटतें मिती ह्मणजे गणती. ५ "बबघडे" पाठांतर. ६ "उडती" पाठांतर. ७ "तत्काळ" पाठांतर.

अती सत्वरें घेतली पूजा । सामोरा आला जनक राजा ।
सौमित्रेंसी जनकराजा । देखोनि विस्मय पावला ॥ ६१ ॥
थोर मस्तावला मनीं । ह्मणे नसत्या साभिमानीं ।
कैसा पडलों जाउनी । धनुष्यपण वेर्थ केला ॥ ६२ ॥
त्रिभुवनसुंदर हें रूपडें । माझी कन्या त्याच्या पाडें ।
परंतु पणासी न मोडे । सत्य प्रतिज्ञा माझी ॥ ६३ ॥
असेल माझी क्रिया वरी । भक्ती वैराग्य तपें करी ।
विदेह नाम सत्योत्तरीं । राम जावाई जोडेल ॥ ६४ ॥
मग आदरें पुरस्कार । पूजिला जानकीचा वर ।
मुनीसहित राजकुमर । घेऊन मंडपा चालिला ॥ ६५ ॥
तव ते मिथिळवासी जन । राम आला आला ऐकून ।
पाहावया स्वानंदघन । गृहें गोपुरीं वेधले ॥ ६६ ॥
सजे गोपुरा थोरथोरा । जन दाटले तेव्हां सैरा ।
सौमित्रेसी सीतावरा । विश्व पाहूं ठाकले ॥ ६७ ॥
त्या विदेहाचें नगर । पाहूं ठाकले राजकुमर ।
विदी आणी बाजार । जन दाटले ते काळीं ॥ ६८ ॥
फिरता राहिले वेत्रपाणी । जाली जनाची दाटणी ।
होतसे मुडुपघसणी । लाहानथोर न ह्मणती ॥ ६९ ॥
सकळ पाहाती स्वानंदघन । दिव्यांबरें परिधान ।
मुगुट किरिटी विराजमान । कुंडलें कर्णीं झळकती ॥ ७० ॥
बाहुवटे वीरकंकणें । पदक माळा अनेक भूषणें ।
कटीं मेखळा वरवेपणें । क्षुद्र घंटिका झळकती ॥ ७१ ॥
चरणीं नेपुरांचा गजर । अंदु तोडराचा क्षणत्कार ।
पृष्ठीं भाते मनोहर । अमोघशरीं दाटले ॥ ७२ ॥

---

१ " कौसल्यात्मजा " पाठांतर. २ मोलाची, तोलाची, योग्यतेची. ३ चढले. ४ " दुर्गो " पाठांतर. ५ मुंडघसणी, खेंचाखेंची, पागोट्याला पागोटें घासून होणारी गर्दी. ६ " मिरवती" पाठांतर. ७ पायांत घालावयाची हंसळी. ८ निष्फळ न होणाऱ्या बाणानीं.

चित्रविचित्र रत्नमणी । च्यांपीं झणत्कारिती किंकिणी ।
आजानुबाहो चूडामणी । करीं कोदंड मिरवती ॥ ७३ ॥
गौरवर्णी सुमित्राबाळ । रामतनु दुर्वादळ ।
जन बोलती तमाळनीळ । जानकीवर हा साजे ॥ ७४ ॥
तव त्या सुंदरालागून । कनकताटीं विराजमान ।
कितीयेक वधुजन । आरत्या वोवाळूं आल्या ॥ ७५ ॥
कितीयेक बोलती । आमुची सीता भाग्यवंती ।
हा वर मदनमूर्ती । ते चि आतां लाधेल ॥ ७६ ॥
वधु करिती निंबलोण । वचनें बोलती सुलक्षण ।
राया पुण्यधारी जनं[3] । राम जावाई जोडेल ॥ ७७ ॥
लक्षानलक्ष द्विजजन । पुरवासी शोभायमान ।
फळ आले घेऊन । शकुनरूप शकुनासी ॥ ७८ ॥
राम पाहिला सावकाश । तृप्ती मना नयनास ।
समस्ता सुखविळास । सभामंडपा आणिले ॥ ७९ ॥
दिव्यासनीं कोदंडमूर्ती । कौशिकापुढें विराजती ।
बैसकार सकळांप्रती । रायें सन्मान दिधला ॥ ८० ॥
सभे बैसले द्विजवर । आणी आठ्यासी सहस्र ऋषेश्वर ।
आले तापसांचे भार । योगी आणि वीतरागी ॥ ८१ ॥
कवी हरी पीपलायनें । बैसले नववंधु येऊन ।
शुकादीक साधुजन । शौनकादिक आले ॥ ८२ ॥
कितीयेक वल्कलधर । किती आले दिगांबर ।
किती जुगाचे अपार । मुद्रासाधक आले ॥ ८३ ॥
नाना सिद्धीचे पाळक । ते हि आले कितीयेक ।
चमत्काराचें कौतुक । दाविते ते हि आले ॥ ८४ ॥

---

१ घनुष्याला. २ घुंगरू. ३ " निंबलोणें " " सुलक्षणें " व " जन " ऐवजी "जेणें" असे पाठ याडांत आहेत. ४ कविर्हरिरंतरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः । आविर्होत्रोऽथ द्रमिळश्चमसः करभाजनः ॥

ब्रह्मचारी आणी गृहवासी । वानप्रस्थ आणि संन्यासी ।
अपार आले सभेसी । पंडित पुराणीक ॥ ८५ ॥
आले कर्मिष्ठ पाषांडी । मतवादी माहावंडी ।
जितुके होते नवखंडीं । नानामार्गी ते आले ॥ ८६ ॥
सुखपात्रें संतमूर्ती । दिगांतपर्यंत होत्या कीर्ति ।
तितुके आले सभेप्रती । विदेहाचे ते काळीं ॥ ८७ ॥
आले सदाचे पुनश्चरणी । आले जटिळ वायोधारणी ।
आले जुगांचे निर्वाणी । नानाव्रतधारी आले ॥ ८८ ॥
जितुके वळी पराक्रमी । शूर विद्येचे आक्रमी ।
माहावीर क्षेत्रधर्मी । कोण आले ते ऐका ॥ ८९ ॥
मार्गधदेशी राजे थोर । कंकणदेशी माहावीर ।
सौराष्ट्र मार्वाड अपार । शाल्यदेशी आले ॥ ९० ॥
कैकट आणी कौसीविरी । सोरट आले गजभारी ।
तारूंत वंगाळांचि थोरी । तेलंग द्राविड आले ॥ ९१ ॥
अंगदेशी वोड्यादेशी । गौड आले संभ्रमेसी ।
घटदेशी बर्वरदेशी । मऱ्हाष्ट्र राजे आले ॥ ९२ ॥
गुजरदेशी जावाळदेशी । पांचाळदेशी श्रृंगाळदेशी ।
सिंधुदेशी विकटदेशी । मल्याळदेशी आले ॥ ९३ ॥
वसीहाळदेशी गौणदेशी । वंगाळदेशी माळवदेशी ।
कौशळदेशी खानदेशी । वराडदेशी आले ॥ ९४ ॥
त्रिपाळदेशी वागलाणी । त्रिशंकदेशाची दाटणी ।
ढकदेशी ते क्षणीं । कर्नाटक आले ॥ ९५ ॥
वीलगडदेशी द्रावती । चिडदेशी आले किती ।
मीरदेशी सभेप्रती । केदारदेशी आले ॥ ९६ ॥
सप्तसागरींचीं वेटें । तेथील राजयाचीं थाटें ।
रावणादि अचाटें । वैभवेंसी आले ॥ ९७ ॥

---

१ "मंगद" पाठांतर २ "सौराष्ट" पाठांतर. ३ "कासीविरी" पाठांतर. ४ "तरुत" पाठांतर ५ "वागळा" पाठांतर.

जेथवरी सूर्याचें कीर्ण । धनुर्विद्येचे प्रवीण ।
माहावळाचे दारुण । जनकसभे आले ॥ ९८ ॥
येकाहून येक थोर । येकाहून येक चतुर ।
पुरुषार्थाचे सागर । सभे नृपति आले ॥ ९९ ॥
सभा घनवटली गजरें । देखतां देवांची दृष्टी फिरे ।
विमानें दाटलीं अपारें । सुरवर समस्त आले ॥ १०० ॥
ते मंडपीची रचना । धिकारिती इंद्रभुवना ।
सकळ संपत्ती विराजमाना । जनकसभे राहिल्या ॥१०१॥
पुढिलिये समासीं ऋषीपैजा । धनुष्य आणील सभे राजा ।
वेणीस्वामी जनकात्मजा । पाहीं येईल संभ्रमें ॥ १०२ ॥
इति श्रीरामायणे आदिकांडे । सीतासैवरनाम समास तिसरा ॥३॥

---

## ॥ समास चवथा ॥

॥ श्रीराम समर्थ ॥

तव ते दोघे कोदंडपाणी । धाकुटे वीरचूडामणी ।
सकळ सभा ते क्षणीं । तटस्थ पाहे तयासी ॥ १ ॥
कौशिकापुढें मदनमूर्ती । राजा देखे सुखावे चित्तीं ।
मनीं ह्मणे कन्येप्रती । ऐसा वर लाधावा ॥ २ ॥
कौशिक बोले मिथिलेश्वरा । दाशरथी राजकुमरा ।
च्याप दाखवी नृपवरा । हे पाहों इछिती ॥ ३ ॥
माहावीर पुरुषार्थी । हे दोन्ही कोदंडमूर्ती ।
तरी तां च्याप शीघ्रगती । सभे आणिलें पाहिजे ॥ ४ ॥
मुनि बोलिला गहन । जनक आश्चिर्य करून ।
ह्मणे तुझें हें वचन । सामान्य नव्हे कौशिका ॥ ५ ॥
मिथिल ह्मणे मुनिवरा । ब्रह्मधनुष्यें दरारा ।
लाविला हे माहावीरा । हीं धाकुटीं लेंकुरें ॥ ६ ॥

येक्षीं गंधर्वी किन्नरीं । पाहोनिया सकळ सुरीं ।
सप्तद्वीपें द्वीपांतरीं । राजे अद्यापी वैसले ॥ ७ ॥
आल अरीराये थोर । नवखंडीचे माहावीर ।
त्यास नव्हे जेयें धीर । हात जोडून राहिले ॥ ८ ॥
कोंजेल्यां वीरां उपजे शंका । देखतां उरीं वैसे धडका ।
च्याप दुर्जय कौशिका । मदनमूर्ती हे दोन्ही ॥ ९ ॥
सभे आणावें कोदंड । मुनी वोलिलास प्रचंड ।
देव राजे मुंडेमुंड । स्थळीं दर्शन घेताती ॥ १० ॥
मनें तुळिलें न जाये । दृष्टीं पाहातां भरे भये ।
राजकुमार हे पाहे । परम धाकुटे सुलक्षण ॥ ११ ॥
तव हर्षे गिरा गद्गदित । रोमांच दाटले स्वेदेंसहित ।
शतानंद पुरोहित । काये वोले जनकासी ॥ १२ ॥
रामप्रताप अद्भुतमहिमा । वोलावया नाहीं सीमा ।
उपमेरहित निरोपमा । थोर आश्चिर्य ऐका हो ॥ १३ ॥
कौशिकें यागरक्षणासी । घेऊन आला राजपुत्रासी ।
येक्या वाणें ताटिकेसी । मार्गी राघवें मारिलें ॥ १४ ॥
येक्या वाणें वीरवाहो । यागीं मारिला सुवाहो ।
पिसोरा लागतां पाहा हो । मरीच आकाशा उडविला ॥ १५ ॥
राया गौतुमवधु माझी माता । शापसीळा पडली असतां ।
रामपदरेणु लागतां । उद्धार जाला ये काळीं ॥ १६ ॥
वोले शतानंद सत्योत्तर । राम लीला अवतार ।
कौशिक वोलिला सुंदर । अन्यथा नव्हे राया ॥ १७ ॥
तव कौशिक वदे मिथिळनाथा । आह्मी वदों ना अन्यथा ।
च्याप आणावें सर्वथा । शकुन गाठीं तूं वांधे ॥ १८ ॥

---

१ प्रतिस्पर्धी राजे. २ आकार्शिले असतां. ३ " वोलसी प्रचंड " पाठांतर. ४ एक एक (?) किंवा श्रेष्ट श्रेष्ठ (?) ५ वाणी, शब्द. ६ " पाठविला " पाठांतर.

रामप्रासीचीं वचनें । कौशिका बोलिलासी गहनें ।
ते म्या अक्षरें वरदानें । शकुन गाठीं घातली ॥ १९ ॥
राजा सांगे प्रधानासी । च्याप आणा हो त्वरेसीं ।
ऐरावत तुछ ज्यासी । असंख्य वारण ते जोडा ॥ २० ॥
तव ते उदितें सकळ । आज्ञा घेऊन तत्काळ ।
नामी वीर माहाबळ । असंभाव्य चालिले ॥ २१ ॥
तों तें येके चित्रशाळे । ठेविलें होतें तेणें काळें ।
पूजा करून घोर बळें । वीरीं वारण जुंपिले ॥ २२ ॥
धनुष्य वोढितां ते काळीं । घोर वाद्यांची धुमाळी ।
माहाशब्दाची आरोळी । आणि कीकाट गजांचे ॥ २३ ॥
गजमस्तकीं माहाबळें । आंकुशें फोडिती गंडस्थळें ।
लक्षानलक्ष तेणें काळें । असंख्य मेटें[3] घालिती ॥ २४ ॥
पाहों ठाकले सकळ लोक । देव करिती कौतुक ।
बोलती हे पिनाक । कैसें जाईल मंडपा ॥ २५ ॥
जनामुखीं हे चि गोष्टी । धनुष्य वोढिता कोण सृष्टी ।
आहे मीं हें च्याप कष्टी । राये सभे चालविलें ॥ २६ ॥
आणीक बोलती कौतुक । ठाउके आहेती तिन्ही लोक ।
दाशरथी रघुनायेक । आला ह्मणोन चालविलें ॥ २७ ॥
तंव तें धनुष्य न चाले । असंख्य वारण मंदावले ।
ब्राह्मण स्तुती प्रवर्तले । सुरवर नवस नवसिती ॥ २८ ॥
घोर वाद्यांचा कडका । गज पीटिती तो तडका ।
आणि हाकांचा भडका । तेणें आकाश तडतडी ॥ २९ ॥
तंव श्रोतीं घेतली आशंका । येवढा जेथें तडाखा ।
तेथें भूमीचा कोण लेखा । विभेछ जाली असेल कीं ॥ ३० ॥

---

१ हत्ती. २ उद्यत, उठून तयार. ३ मेटें घालिती=रडकुंडीस येती. मेट ह्मणजे महांत, असा एक शब्द आहे. ४ " विमानी " पाठांतर. ५ शिवधनुष्य. ६ वोढणारा. ७ मग. ८ तडाखा. ९ सलज्ज, लज्जायुक्त.

तरी त्रिवकधनुष्य तें सज्ञान । पां चि भूमी शोभायमान ।
रामा मिरवणें लागून । अति संभ्रमें राखिली ॥ ३१ ॥
भागलीं वारणाचीं थाटें । आणीक जुंपिती अचाटें ।
माहा उग्र थोऱ्या कष्टें । सभेमध्यें आणिलें ॥ ३२ ॥
पंचसहस्र घंटा किंकिणी । जया लागले रत्नमणी ।
अमोल्य वस्त्रांची गवसणी । माहाउग्र पिनाक तें ॥ ३३ ॥
सभेचिया आंगणांत । धनुष्य पडलें अद्भुत ।
तेणें वळियाचें चित्त । चिंतावर्तीं घातलें ॥ ३४ ॥
येका धाक भरला पोटीं । येकीं पल्लवें लाविले दृष्टी ।
येक ह्मणती लाज मोठी । येथें येऊन लागली ॥ ३५ ॥
येकांचा ऊर तडतडी । येकां आली हुडहुडी ।
येक धीराचे परवडी । कानगोष्टी लाविल्या ॥ ३६ ॥
येक ह्मणती उग्र च्याप । देखतां दृष्टी भरे कंप ।
येक फेडिती आक्षेप । देवांगींवीं वोढावें ॥ ३७ ॥
उगें चि पाहावें कौतुक । कोण वोढील नायक ।
आह्मी वऱ्हाडी नेमक । ऐसे किती बोलती ॥ ३८ ॥
येक ह्मणती चक्रवर्ति । हा राजा मिथिळापती ।
आह्मी याचें ठेवणें किती । बोलून मौन्य राहिले ॥ ३९ ॥
तंव जनकरायें ते काळीं । गंधें धुशरें परिमळी ।
पुष्पें तांबोल विऱ्हळी । पूजा अनुक्रमें चालविल्या ॥४०॥
शतांची सहस्रे फिरती । रम्य पूजा ते करिती ।
सुंदर वाद्यें वाजती । नाना प्रकारीं विविधें ॥ ४१ ॥
तंव तें रत्नमणीचें मंदिर । नवखणाचें दामोदरें ।
लक्षानलक्ष जाळांधर । सूक्ष्म दृष्टी परभासे ॥ ४२ ॥

---

१ पद्दा. २ चि=ती ३ आच्छादन. ४ पदर ५ ढोंगानें, सभ्रमानें ६ (?) देवाविवानीं. ७ पदरचे, आंकित. ८ " विलाळी " पाठांतर (?) विवळ=सविस्तर. ९ " रंग " पाठांतर. १० रत्नखचित मंदिर. ११ प्रभासे.

आणीक त्याची अपूर्वता । जे मंदिरीं तद्रूपता ।
विळासती लखलखिता । परम शोभायमान ॥ ४३ ॥
तेथें पाइरिया त्या साधका । येकाहूनि येक अधिका ।
चढें चढें मंगळिका । अष्ट जिनसी साऱ्नी ॥ ४४ ॥
नवमे स्वर्णी मनोरमा । जानकी पाहों आली रामा ।
सखी विजया उत्तमा । तिसी बोलती जाली ॥ ४५ ॥
राम आला आला हे वार्ता । म्या ऐकिली गे तत्वता ।
सभे रायामध्यें कोणता । दावीं मज श्रीराम ॥ ४६ ॥
शंभुआराधनी केवळ । नामी बैसले भूपाळ ।
छत्रपती माहाबळ । सखी अनुक्रमें दाखवी ॥ ४७ ॥
बोले जनकाची कुमरी । कां सिणविसी वागेश्वरी ।
सर्वथा भरीं नको भरीं । दावीं मज श्रीराम ॥ ४८ ॥
कोण तो गे आत्माराम । कोण तो गे सुखधाम ।
विश्रांतीचा हि विश्राम । मदनमूर्ती दाखवीं ॥ ४९ ॥
सखी ह्मणे सावधान । कौशिकापुढें विराजमान ।
सुंदर मूर्ती जगजीवन । पैल पाहें जानकी ॥ ५० ॥
पाहे मैथिळी[1] विळास । दुर्वादळ तनु दिसे ।
कोटी मदनाचे विशेषें । निंबलोण[2] सुखासी ॥ ५१ ॥
मुगुट किरटी रत्नमणी । जिनस जिनसी बैसल्या चुणी ।
मकर कुंडलें सुंदर कर्णी । डोलती तेज झमंके[3] ॥ ५२ ॥
आकर्ण पूर्ण रमणीय । सुंदर नयन पैल पाहे ।
सकळामध्यें शोभताहे । नव्हे सर्वांसारिखा ॥ ५३ ॥
विशाळ भाळ गे मनोहर । त्यावरी रसाळ केशर ।
टिळक रेखिला सुंदर । सुरंग अक्षता झळकती ॥ ५४ ॥

---

१ जानकी. "मैथुळी" पाठांतर. २ निंब=लिंबु. लोण=लवण, मीठ. पण लवण याचा अर्थ सुंदर असा हि आहे व तो च या ठिकाणीं घ्यावा. लिंबाप्रमाणें सुंदर. ३ "डोलें तेज झमकतें ।" पाठांतर.

नासिकीं विंब वरवेपणें । रूपें रसाळ जालीं हीणें ।
सुवास दाटला तेणें गुणें । सभे भ्रमर लोटला ॥ ५५ ॥
स्मित अधर गे विराज । दंत पंगती हेलावे तेज ।
इंदुवदी मंगळराज । निर्मासुर सुख पाहे ॥ ५६ ॥
कंठीं माळा अनर्घ्यमणी । आपाद पर्यंत वरवेपणीं ।
हृदयपदकें सतेजखाणी । राम तो गे जानकी ॥५७॥
निर्मळांगा निर्मळा । चंदन उटी सुमनमाळा ।
बाहुभूषणीं नाना कीळा । रत्नमणींच्या फांकती ॥ ५८ ॥
पैल पाहे राजकुमरी । सुंदर शाम पीतांबरधारी ।
कटीं मेखळा साजिरी । क्षुद्र घंटिका मिरवती ॥ ५९ ॥
वरदपाणी मंगळराज । पैल पाहे करांबुज ।
वीरकंकणें तेजःपुंज । नाना भूषणें मुद्रिका ॥ ६० ॥
तो गे सीते कोदंडपाणी । अमोघ भाता भरला बाणीं ।
पुरुषामध्यें मुगुटमणी । समस्तांचा विराजे ॥ ६१ ॥
सवें बंधु सुलक्षण । चामर ढाळी लक्ष्मण ।
जें सर्वांचें भूषण । राम तो गे जानकी ॥ ६२ ॥
पाहे जानकी मनोहर । आवघे दिसती किंकर ।
षड्गुणसंपन्न जगदीश्वर । राम तो गे जानकी ॥ ६३ ॥
सीता पाहे मदनमूर्ती । तव त्या अवघ्या चितोर्वृत्ती ।
रामीं वेधल्या विश्रांती । निचेष्टित राहिली ॥ ६४ ॥
सखी ह्मणे गे सावधान । आझुनी जालें नाहीं ध्यान ।
पदकमळें दाखवीन । सख्य उत्तीर्ण हें माझें ॥ ६५ ॥
सकळ भूषणीं तेजःपुंजें । पैल पाहें पदांबुजें ।
नीळवर्णी मंगळराजे । सामुद्रिकें शोभती ॥ ६६ ॥

---

१ "बोक" पाठांतर, तेज. २ सुरेख, भरलेलें. ३ अनर्घ्य=विनमोल. ४ किरणें, प्रभा. ५ "च्या" च्या ऐवजीं "त्या" असें पाठांतर. "त्या" ह्मणजे हि "च्या" च. ६ चित्तवृत्ति.

पदकमळीं विराजतो । तोडर ब्रीदाचा गाजतो ।
जनकनंदिनी पाहे तो । निश्चयेसी श्रीराम ॥ ६७ ॥
चरणकमळें विराजमान । आपुली मिरासी देखोन ।
जानकी चालिलें स्फुंदन । रोमांच आंगीं थरथरिलें ॥ ६८ ॥
सुख दाटलें अंतरीं । शब्द फुटेना बाहेरी ।
निचेष्टित धरेवरी । जनकात्मजा ते काळीं ॥ ६९ ॥
रामरूपें वारिलें मना । गळित जाल्या भावभावना ।
पाहात होती त्या नयना । सुखें पाहाणें राहिलें ॥ ७० ॥
जनकात्मजेचें वेधलें मन । सखिया ह्मणती गे सावधान ।
ते समई न ये वचन । मौन्य मुद्रा पातली ॥ ७१ ॥
सुखपात्र ते जनकदुहिता । रामरूपें सर्वस्वता ।
वेधली ते सुखवार्ता । वाचे केवीं वदवेल ॥ ७२ ॥
जानकीचा आनंद गहन । कांहीं बोलावया वांछी मन ।
तरी धनुष्ये टाकिलें हें आणून । प्रसंग समयो पाहिला ॥ ७३ ॥
तव ते जनकाची नंदिनी । आनंद अवस्था सारुनी ।
सखियेसी सुवचनीं । काये बोलती जाली ॥ ७४ ॥
मंगळनिधी सुंदर शाम । कैसी पावेन मी रघोत्तम ।
रायाचा पण दुर्गम । रामीं अंतर पाडिता ॥ ७५ ॥
रायें राय आणिले थोर । रामावेगळा कोण्ही वीर ।
धनुष्ये वोढितां हें शरीर । मी न ठेवीं सर्वथा ॥ ७६ ॥
धनुष्य अभाग्य वोढवलें । रामप्राप्तीं आड ठेलें ।
रघुकुळरत्ना दुऱ्हाविलें । पणें केलें रायाच्या ॥ ७७ ॥
भाग्य आलें अवचित । परी तें न भोगितां दैवहत ।
रायें साभिमानी चित्त । तयापरी घातलें ॥ ७८ ॥
धनुष्य परम कठोर । मदनमूर्ती हा रघुवीर ।
त्याचे प्राप्तीचें अंतर । हे वार्ता साहेना ॥ ७९ ॥

---

१ यतन, २ " फुंजन " पाठांतर. ३ " निचेष्ट पडिली " पाठांतर.

रामवियोगाची आपदा। हे मज न साहे गे कदा।
प्राप्तीसमये परिबाधा। धनुष्यविघ्न उद्देलें ॥ ८० ॥
राया कळेचिना कैसें। मज रामा द्यावें ऐसें।
मग ते जानकी तदंशें। रामा शरण रिघे ॥ ८१ ॥
ह्मणे जय जय जी रघुनायका। सत्यप्रतिज्ञा शब्द निका।
तरी मज वरावें रविकुळटिळका। अंतरसाक्ष जाणोनी ॥८२॥
माझ्या पित्यानें केला पण। च्याप टाकिलें हें आणून।
तूं वीरवाहो आज्ञन। धनुष्य कैसें उरलें हें ॥ ८३ ॥
तुजवेगळा माहावीर। त्रैलोकीं आहे कोण धीर।
तरी न करी माझा आव्हेर। ये समई मज जिंकावें ॥ ८४ ॥
रत्न कीळा नव्हे भिन्ना। स्वाद रसीं निवडेना।
साक्षी काढितां निघेना। कार्यामधुनी ॥ ८५ ॥
तैसी रघोत्तम आणी सीता। दोघे येकरूप पाहातां।
तरी राममाप्तीची चिंता। केवीं स्पर्शे मैथिली ॥ ८६ ॥
तों ते सभेचा गजर। येकाहून येक वीर।
अतिरथी नामधार। माहारथी बैसले ॥ ८७ ॥
सकळां पूजा जाली सांग। नाना उपचारी नाना रंग।
कार्यभागाचा प्रसंग। मिथिळरायें काढिला ॥ ८८ ॥
राजे पाहोन सभेसी। बोलतां जाला त्या समयासी।
धनुष्य वोढील त्यासी। कन्या देईन माझी ॥ ८९॥
पाये धोऊन करीन पूजा। माझी प्राणकळा हे आत्मजा।
विधियुक्त देईन वोजा। सत्य प्रतिज्ञा माझी ॥ ९०॥
वचन होतां तें श्रवण। हरुषें उठिला रावण।
सभा लक्षून कुलक्षण। काये बोलतां जाला ॥ ९१ ॥
मिथिळा हातीं घेईन पूजा। मी वरीन जनकात्मजा।
धनुष्य देखोनि माझ्या भुजा। स्फुरण करिती वीर हो॥९२॥

१ राया २ "राजा" पाठांतर. ३ "त्या समयासी" ऐवजी "सकळासी" पाठांतर.

म्या हिंदोळिला कैळास । समुद्र केला कासावीस ।
वोढून काढीन आतां शेप । वराह उचलीन वीस भुजीं ॥९३॥
तेथें कायेसें हें पिनाक । मज आणी याचा धाक ।
इंद्र धनुष्याचा गर्मक[1] । तृणतुच्छ म्या केला ॥ ९४ ॥
प्रतिज्ञा वोलिला उदंड । उचलूं गेला कोदंड ।
तंव तें चळेना प्रचंड । सीमा सांडून जड जालें ॥ ९५ ॥
त्रिवकधनुष्य तें पवित्र । रावणकर अपवित्र ।
स्पर्शे करितां दशवगत्र । थरथरां कांपतु ॥ ९६ ॥
जानकी ते रामकांता । आणी सर्वशक्ती ते तत्वता ।
रावणा क्षोभली आदिमाता । शक्ती वोढून घेतली ॥ ९७ ॥
धनुष्य उचलूं गेला लीळा । तंव तें आटोपेना वळा ।
कांपो लागला चळचळा । गुढगे मांड्या टेकितु ॥ ९८ ॥
मेटें घालून[2] सांवरी । तंव तें आदळलें उरी ।
आडोंनि धरेवरी । किरविल[3] जैसा पसरला ॥ ९९ ॥
ऊर दडपिला धनुष्यें । स्वास टाकाया संधी नसे ।
हातपाय झाडीतसे । फडफडां धरणीसी ॥ १०० ॥
मुखीं रक्त लोढे[4] खोटी[5] । फिरती नेत्र चक्रवाटी ।
धनुष्य वळें हृदय लाटी[6] । वेथा मोठी रावणा ॥ १ ॥
कांहीं उपाव न दिसे । प्राणसंकट मांडलेंसें ।
दांत खाऊन वोलतुसे । धांवा धांवा वळिये हो ॥ २ ॥
रावणगर्वाचें वोडंवरं[7] । त्रिवकधनुष्यें केला चूर ।
ह्मणे मेलों उठा वीर । काय आतां[8] पाहातां ॥ ३ ॥

---

१ गमका, गर्व. २ गुडघे जमिनीवर टेकून. ३ " किर्मीर " चा अपभ्रंश किरविल दिसतो. भीमानें " किर्मीर " नांवाचा राक्षस मारला होता. ४ गुरळ्या. ५ प्रतिबंध. तोंडामध्यें रक्ताच्या गुळण्या येऊन श्वासाला प्रतिरोध होऊन रावणाचे डोळे चक्रवाताप्रमाणें गरगर फिरूं लागले. ६ धनुष्यानें जोरानें रावणाची छाती लाटल्यामुळें स्वास परम व्यथा झाली. ७ अवडंबर. ८ " अंत " पाठांतर.

रावणाची अवकळा । दुःख देखोन भूपाळा ।
कित्येकां वाटली सुखवेळा । किती विस्मये पावले ॥ ४ ॥
किती बोलती नृपवर । ह्मणती रावणा लागला घोर ।
आतां कोण आहे वीर । धनुष्य वोढून दाकिता ॥ ५ ॥
तंव ते मिथिळाचे प्रधान । समस्त हि गजबजून ।
उभे राहिले विराजमान । काये बोलती जनकासी ॥ ६ ॥
ह्मणती राया चक्रवती । समस्त आणिले भूपती ।
येक येक वीर त्रिजगती । जिंकिती ऐसे आले ॥ ७ ॥
हे आवघे चि क्षेत्रधर्मी । यामध्यें हा पराक्रमी ।
त्या रावणाच्या भुजा भूमी । धनुष्याखालीं आडकल्या ॥८॥
तरी त्रिभुवनजयश्रीमंगळा । राया जानकी दिव्य बाळा ।
पणधनुष्याची अर्गळा । कोणा माळा घालील ॥ ९ ॥
तें ऐकोन मिथिळापती । काये बोलिला सभेमती ।
सप्त द्वीपांचे भूपती । द्वीपांतरीचे आले ॥ ११० ॥
माझी कन्या सुलक्षण । सकळकळापरिपूर्ण ।
कीर्ति सूर्य फांकले कीर्ण । लाभ अभ्यागत हे रॉजे ॥ ११ ॥
तरी भूपती अथवा सुरवर । च्याप वोढील जो कां वीर ।
त्याचे कीर्तीचा विचार । तिन्हीं लोकीं वाढेल ॥ १२ ॥
कोण्ही उचलीना चढवीना । कोणी कान्हाडी वोढींना ।
पुरुपार्थास दाखवीना । इतुक्यामध्यें येक ही ॥ १३ ॥
तरी निर्वीर जाली हे धरा । पुरुपार्थ सरला येकसरा ।
माझे कुमरीस नोवरा । निर्मिता विधी विसरला ॥ १४ ॥
सभे वैसले भूपाळ । अधोमुख माहाबळ ।
सकळ मान्ये सुमित्राबाळ । काये बोले रामासी ॥ १५ ॥

---

१ " रायासी " पाठांतर २ क्षत्रियधर्मा. ३ आलेले, अतिथि. ४ माझ्या कन्येच्या कीर्तिरूप सूर्यांच्या फाकलेल्या किरणांना आकृष्ट होऊन आलेले असे हे राजे आहेत. ५ " विस्तार " पाठांतर, ६ " वोढी कानाडी आणीना । " पाठांतर.

श्रीरघुवंशरत्ना पाहे । विमळ दास मी तुझा आहे ।
माझ्या बळापुढें स्वामी हें । च्याप केवी उरेल ॥ १६ ॥
मेरुपर्वतसागरेंसी । धरा झेलीन फळाऐंसी[1] ।
या पिनाकाची कायेसी । वार्ता तेथें ॥ १७ ॥
तंव विश्वामित्र ह्मणे फणिवरा । तूं बोलिलासी अर्थ खरा ।
परी धनुप्यगर्वपरिहारा । तूं नव्हेसी सौमित्रा ॥ १८ ॥
आतां पुढं[2] अनुसंधान । रावणा देतीं जीवदान ।
वेणीस्वामी रघुनंदन । च्याप भंगिती अवलीळा ॥ ११९ ॥
इति श्री रामायणे आदिकांडे सीतासैवर नाम । समास चौथा ॥छ॥

---

## ॥ समास पांचवा ॥

॥ श्रीराम कर्ता ॥

तों कौशिक ह्मणे रघुनाथा । रावण पावलाहे परम वेथा ।
त्यासी वांचवावें समर्था । च्याप बोदून टाकावें ॥ १ ॥
मदनमूर्ती सुंदरशामा । वीरबाहो रघोत्तमा ।
निरोपम्य अक्लेष्ट[3]कर्मा । नाम तुझें तुज साजे ॥ २ ॥
आमुचें वाक्य येथार्थ । कर्ता तूं येक समर्थ ।
आणी जनकमनोरथ । सत्य सिधी पाववितां ॥ ३ ॥
मदनमूर्ती सुंदर । उभा राहिला सीतावर ।
मुंनीस केला नमस्कार । सर्वज्ञ विधीपाळकें ॥ ४ ॥
करुणाकर नाम साजे । पूर्ण प्रतापी ब्रीद गाजे ।
चामरकरी बंधुराजे । समागमी चालिजे ॥ ५ ॥
अंदु झणाणी चरणीं । नेपुरें वाकी कटकिंकणी[4] ।
तनु गुप्तविभूपणी । भूपणमूर्ती विराजे ॥ ६ ॥

---

१ मेरु पर्वत व सागर यांच्या सह या पृथ्वीला फळाप्रमाणें झेलीन. २ " पुटिलोये समासीं " पाठांतर. ३ अक्लिष्टकर्म, ज्याची क्रिया क्लेशरहित आहे, दुसऱ्याला त्रास देत नाहीं, असा. ४ कमरेच्या घागऱ्या.

संत सुखपात्रें अमूपें । समस्त मोहिली रामरूपें ।
तटस्त जैसी चित्रलेपें । ठेकार मूर्ती देखोनी ॥ ७ ॥
देवा वाटला साभिमानी । सुंदर धाकुटा भोळा जनीं ।
जानकी भावना जाउनी । माळ घालूं आतां ॥ ८ ॥
भक्तराज सभेमती । त्यास भावला ध्येयमूर्ती ।
सभे बैसले भूपती । माहावीर त्यास भासे ॥ ९ ॥
सुंदरमूर्ती सुलक्षणी । आळंकृत सकळगुणी ।
सौमित्रिसी च्यापपाणी । धनुष्यापासी चमके ॥ १० ॥
तंव तो बंधुराजचूडामणी । शेष प्रार्थितसे धरणी ।
तां धीर धरावा ये क्षणीं । राम धनुष्य वोढितां ॥ ११ ॥
चौदा भुवनें याचा पोटीं । तूं दडपसी वामांगुष्टीं ।
निघसी पाताळकपाटीं । तरि तां धीर धरावा ॥ १२ ॥
प्रार्थितसे दिग्गजासी । तुह्मी वोढून धरावें पृथ्वीसी ।
मग तो नमी शेषासी । ह्मणे धीर धरावा ॥ १३ ॥
वामांगुष्ठभारें करूनी । हे ढळेल अवनी ।
तरी तां सहस्रफणी करूनी । क्षिती आवरिली पाहिजे ॥ १४ ॥
कूर्मास ह्मणे धीर धरीं । वराहाची प्रार्थना करी ।
तकवो करा क्षणभरी । राम धनुष्य वोढितां ॥ १५ ॥
सौमित्र बोलतां क्षण । धनुष्य घोर कठिण ।
आणि सुंदर राम सुलक्षण । समस्त पाहों ठाकले ॥ १६ ॥
तव तें भारी ठाणधीरें । सभ्य थिर जें गंभीर ।
वामचरणांगुष्ठाचें अग्र । तेणें च्याप लोटिलें ॥ १७ ॥

---

१ तसबिरी. २ मनोहर. ३ "भावला" पाठांतर. ४ त्या वेळीं राम कसे
दिसले ? देवाना साभिमानी भासले, सामान्य जनाना सुंदर धाकुटे वाटले, जान-
कीला माळ घालाविशा वाटला, सभेंत जे भक्त होते त्याना श्रीरामाचें ध्यान करा
वेंसें वाटलें, आणि राजेलोकाना राम महावीर भासले ५ धीर. ६ "भार" पाठांतर.
७ सदृढ, जमीनीवर दृढ रोविलेलें ८ स्थिर.

ब्रह्मांडतुळणेचें च्याप । आणि अनंतब्रह्मांडाचा हा बाप ।
धनुष्यभयाचा खटाटोप । तृणतुछ जाला ॥ १८ ॥
सरळ सुंदर बाहुदंड । लीळें उचलिलें कोदंड ।
रामें चढवितां ब्रह्मांड । डगमगूं लागलें ॥ १९ ॥
ते समयींचा कर्कराट । च्यापआडानें थर्थराट ।
सकळां मांडलें संकट । धीर धरून पाहाती ॥ २० ॥
लीळा लावविलें च्याप पाणी । तेणें महिपाळाच्या मानहाणी ।
संध्यारागाच्या कमळणी । धरा लक्षिती तैसे ॥ २१ ॥
सीतें चढवितां रघुनंदनें । उत्फुल्ल ऋपींचीं आननें ।
हरुप रोमांच स्फुराणें । तनु उदित जनकेसी ॥ २२ ॥
पूर्ण प्रतापी रघुराज । वीरबाहो तेजपुंज ।
घोर च्याप केलें सज्ज । वाम करें तुळिलें ॥ २३ ॥
सुंदरशाम सीतारंग । वज्रठाण तें वक्रांग ।
च्यापबोढणी चित्तरंग । आणिला नेणों जानकीचा ॥ २४ ॥
धनुष्य वोढितां प्रसंगें । वामचरणांगुष्ठाचेनि ऑंगें ।
भूमी रेटिली तेणें वेगें । हैलकालोळ तळातळीं ॥ २५ ॥
रामलीळा इतरां मरण । सहस्रफणीला निर्वाण ।
दिग्गजाचे हाल कोण । धरा वोढितां ते काळीं ॥ २६ ॥
वराहदंताग्रीं वसुमती । ढळोन रसातळातें जाती ।
मुख पसरूनि क्षिती । सर्वदशनीं धरितसे ॥ २७ ॥
भारें दडपली कूर्मपुष्टी । प्राण गोळां जाले कंटीं ।
पाय होते त्याचे पोटीं । सत्वहिण पसरले ॥ २८ ॥
वोढी येतां आकर्णीं । च्याप ताणलेंसे गुणीं ।
मुष्टी पिळिलें ते क्षणीं । कर्कश घोप धुमधुमिला ॥ २९ ॥

---

१ "जाहाला" पाठांतर. २ हातानें. ३ सूर्यास्ताच्या वेळीं कमलें जशीं म्लान होतात, तद्वत् भूपाळांनीं लज्जेनें माना खालीं घातल्या. ४ शीत, धनुष्याची दोरी. ५ "अमें" पाठांतर. ६ हाहःकार. ७ तळतळ, हाहःकार, गडबड. ८ दशन=दांत.

आजानवाहो तो जगदीश । सीत पुरेना कान्हाडीस ।
घर्ले च आणितां मुष्टीस । कडकडकड नादालें ॥ ३० ॥
भंगलें कोदंड टाकून । राम सभे-शोभायमान ।
तव दुमदुमकारें गगन । ब्रह्मभळय मांडला ॥ ३१ ॥
रामें वोढितां कोदंड । मध्यें चि जालें दुखंड ।
ध्वनि दाटलें ब्रह्मांड । नभ कर्कश गर्जेतसे ॥ ३२ ॥
मेरुमांदारसिखरें । घडघडिलीं ते अपारें ।
सप्त पाताळ दिगांतरें । नादें डोले वसुमति ॥ ३३ ॥
खळवळिले सप्त सागर । चंद्रागीर द्रोणागीर ।
तेव्हां खचले अपार । नक्षत्रझडी वैसली ॥ ३४ ॥
वैसली सभा तटस्थभूत । आवघे देव पडिले भ्रांत ।
कौशिक जनक रघुनाथ । यावेगळे करूनि ॥ ३५ ॥
सर्व शक्तीचा सारांश । विधीनें निर्मिलें होतें धनुष्य ।
अद्भुत दाटला घोश । ब्रह्मकोशीं यालागीं ॥ ३६ ॥
ध्वनि ब्रह्मांडा झेप घाली । नादकळा निमोन गेली ।
जगीं गाजे हे चि बोली । रामें धनुष्य भंगिलें ॥ ३७ ॥
राया जनकाचें भाग्य थोर । गगनीं दाटला जयजयकार ।
पुष्पें वरुपले सुरवर । आणी दुंदुभी लागल्या ॥ ३८ ॥
पूर्णानंदें मंगळतुरें । वाजों लागलीं अपारें ।
ऋषी ब्राह्मण जयजयकारें । विश्व आनंदें दाटलें ॥ ३९ ॥
जनक आनंदेंभरित । पूर्ण जाले मनोरथ ।
विदेह साधनफळ उचित । अगाध प्राप्ती पावला ॥ ४० ॥
न कळे महिमा जनकाचा । आणी त्याच्या साधनाचा ।
राम आत्मा त्रैलोक्याचा । जामाईत्वें जोडला ॥ ४१ ॥
पूर्णानंदें विराजमान । थोर पावला समाधान ।
राजा नारदा पुरातन । कथा सांगतां जाला ॥ ४२ ॥

१ " तुपरे " पाठांतर. २ " गढ्न " पाठांतर. ३ " वाजतसे " पाठांतर.

राजा बोले नारदासी । पूर्वीं त्रिपुरवधासी ।
या महेशच्यापासी । शिवें निर्माण केलें ॥ ४३ ॥
त्रिपुरवध जालियावरी । माझ्या पितामहाच्या घरीं ।
शंकर परम सख्य करी । हें च्याप ठेविलें होतें ॥ ४४ ॥
तरी देवऋषीयाकारण । म्या दुर्जय केला पण ।
माझी कन्या सुलक्षण । ईच्या पाडें वरासी ॥ ४५ ॥
तरी तो माझा मनोरथ । सिधी पावला येथार्थ ।
राम जावाई समर्थ । तुमचे कृपें लाधलों ॥ ४६ ॥
नारद वदे चक्रवती । येथार्थ बोलिलास सुमती ।
राम जावाईत्वाची प्राप्ती । देहांतसाधनें त्वां केली ॥ ४७ ॥
देवाधिदेव जगदीश । आमुची विश्रांती हा परेश ।
तुझे मंडपीं सावकाश । धन्य दिवस सुखाचा ॥ ४८ ॥
आतां पुढिलिये समासीं कथारस । व्हाड येईल मिथिळेस ।
वेणीस्वामी सकळांस । भेटी उत्साहें देतील ॥ ४९ ॥
इति श्री रामायणे आदिकांडे सीतास्वैवर नाम । समास पांचवा ॥५॥

---

## ॥ समास साहावा ॥

॥ श्रीराम कर्ता ॥

रामप्रताप देखोन । जनक आश्चिर्य करून[१] ।
पूर्ण पावला समाधान । मनासारिखें जालें ॥ १ ॥
थोर आनंदभरित । सिधी पावले मनोरथ ।
चित्त उछाहा उदित । अति संभ्रमें रायाचें ॥ २ ॥
राम अक्लेष्टकर्मागती । मिथिळा आनंद न सांटे चित्तीं ।
प्रांजळी[३] करूनि कौशिकामति । काये बोलता जाला ॥ ३ ॥

---

१ " भेटी उछाह गाजे । " पाठांतर २ " जनका आश्चिर्य गहन । " पाठांतर.
३ हात जोडून.

ह्मणे मुनि मुगुटमणी । मज दाखविला कोदंडपाणी ।
माझी प्रतिज्ञा ये क्षणीं । सत्य केली तां कौशिका ॥ ४ ॥
माझ्या भाग्याची सकळ कळा । परम सुलक्षण सुसीळा ।
कन्या माझी मुनिशार्दुला । रामा दिली ये काळीं ॥ ५ ॥
तरी हा उत्छाह मुनिवरी । तुह्मी करावा कृपेश्वरी ।
सर्व आहे सकळ प्रकारी । आशीर्वादें तुमच्या ॥ ६ ॥
तुमचे कृपेचा फळयोग । मज राम जावाई हा प्रसंग ।
याची पूजा येथासांग । करूं इछी मी कौसिका ॥ ७ ॥
मुनि तोष पावोन । ह्मणे बोलिलासी राया धन्य ।
राम जावाईत्वें पूजन । आराधिलें पुर्वी तां ॥ ८ ॥
थोर आनंद जनकासी । काये बोले मुनीसी ।
मूळ जावें अयोध्येसी । रायें आलें पाहिजे ॥ ९ ॥
तंव गर्गाचार्या बोले भूपति । मूळ धाडा सीघ्रगति ।
लग्न आठ तीन रात्री । अवधी इतुकी आहे ॥ १० ॥
जोतिसी बोलिला वचनासी । हो जि ह्मणोन तयासी ।
राजा शोभनपत्रिकेसी । अति उत्छायें पाठवी ॥ ११ ॥
सुंदर पत्रिका मंगळाक्षरें । अर्थवचनें उपचारें ।
राम प्रताप आत्यादरें । मातुका अर्थ धवधवी ॥ १२ ॥
रायें लिहिला मनोरथ । इछित पावलों येथार्थ ।
मज सेवका करावें समर्थ । सुहृदेंसी यावें ॥ १३ ॥
वेळ न लवावा भूपति । आलें पाहिजे सीघ्रगति ।
लग्न आठ तीन रात्री । कळलें पाहिजे प्रभूसी ॥ १४ ॥
राजपत्रिका विराजमान । समागमें श्रेष्ठ प्रधान ।
चतुरंग सेना घेऊन । मूळ गेलें अयोध्ये ॥ १५ ॥
मिथिलेश्वराचे मुळहारी । आले अयोध्ये बाहेरी ।
समाचार राजेंद्ररी । घेऊन राया जाणविती ॥ १६ ॥

---

१ " सुवर्ण " पाठांतर. २ इष्टमित्रासह. ३ " देवाज्यानें " पाठांतर, या पाठांतराचा अर्थ काय ? ४ राजाचे दूत.

धनुष्य वोढितां रघुनाथा । मोडोन पडलें जि समर्था ।
जनक पावला मनोरथा । उछाहमूळ तुह्मांसी ॥ १७ ॥
रायें ऐकतां वचना । संभ्रमें धाडिलें प्रधाना ।
थोर करून सन्माना । सभे मुल्हारी आणिले ॥ १८ ॥
तेहिं नमिलें वसिष्ठासी । परम आल्हादें रायासी ।
वहुमानें मुळारियांसी । वैस वैसकार जाले ॥ १९ ॥
पत्रिका ठेविली रायापुढें । वचनें वोलती जाडें जाडें ।
मिथिळेशाचें भाग्य गाढें । पाये जोडले तुमचे ॥ २० ॥
जनकरायें नमस्कार । सांगोन वोलिला उत्तर ।
मज सेवका करावें थोर । सीघ्र आलें पाहिजे ॥ २१ ॥
पत्रिका वाचितां भूपति । रामप्रताप अद्भुतगति ।
राया आनंद न माये चित्तीं । थोर आश्चिर्यें दाटला ॥२२॥
तैसा चि वोले तयातें । सांगा सांगा जि मागुतें ।
माझ्या मदनमूर्ति रघुनाथें । कैसी मारिली ताटिका ॥२३॥
चरणीं सीळा मानुषी कैसी । दुर्जेये भंगिलें धनुष्यासी ।
राम सुखें सौमित्रेसी । हें स्वागत सांगा जी ॥ २४ ॥
मग ते वोलती भूपति । कल्याण दोन्ही कल्याणमूर्ति ।
कौशिक नेतां आश्रमाप्रति । मार्गीं ताटिका मारिली ॥२५॥
याग जाला शोभायमान । ऋषीमेळें रघुनंदन ।
मिथिळे जातां विराजमान । माहासंभ्रमें करूनि ॥ २६ ॥
राम चालतां ऋषीमेळें । वाम चरण लागला सीळे ।
तव ते अहिल्या तेणें काळें । पूर्व देहे पावली ॥ २७ ॥
चरणीं अहिल्याविमोचन । गौतमा दिल्हें स्त्रीदान ।
सौमित्रेंसी रघुनंदन । मिथिळे आणिले कौशिकें ॥ २८ ॥
रायें राये जाले दीनें । धनुष्य मोडिलें रघुनंदनें ।
मिथिळरायें सन्मानें । जानकी दिल्ही राघवा ॥ २९ ॥

तीन कन्या जनकासी । देऊन सोडिलें चिंतेसी ।
तरि त्या कोण कोण तुह्मासीं । कळलें पाहिजे समर्था ॥३०॥
अपकीर्ति नेली रावणें । लज्या भूपाळांकारणें ।
कीर्ति वरिली सीतारमणें । उछाहमूळ तुह्मासीं ॥ ३१ ॥
सर्वांगाचे करून कान । राजा जालासे तल्लीन ।
तें सांगों तरि समीप लग्न । ह्मणोनि वाचा आटोपिली ॥३२
राया संतोप नावरे । वशिष्टासी वोले त्वरें ।
अद्भुत केलें रघुवीरें । कोण आश्चिर्य पाहा हो ॥ ३३ ॥
वशिष्ट वोले दशरथा । राम अवतारी सर्वथा ।
तुझें भाग्य हें समर्था । काये ह्मणोनि वर्णावें ॥ ३४ ॥
वशिष्ट वोले नृपवरा । थोर मुहूर्ताचा उभारा ।
सेना चत्वार सीध करा । ये च समई चालावें ॥ ३५ ॥
राममताप गहन । वशिष्टें कौसले सांगोन ।
निजमाता विराजमान । परमानंदें ते काळीं ॥ ३६ ॥
सभानायेक रायासी । वचनें वोलती विळासी ।
शरीरसमंध तुह्मासी । कोण भाग्य मिथिळाचें ॥ ३७ ॥
वोले राजों दशरथ । आमुचे मनीं होता हेत ।
तोलासम मिथिळानाथ । जनक व्याहीं करावा ॥ ३८ ॥
परस्परें प्रत्योत्तरें । उभय रसाळ उत्तरें ।
तव राणेवंसां[1] गजरें । पाक जाले उत्तम ॥ ३९ ॥
वशिष्टादि मुनिपांती[2] । पाहुणे रायपंगती ।
सारून भोजनें समस्तीं । संभ्रमें वऱ्हाड निघालें ॥ ४० ॥
शारदा गणपति वहुमानें । कौसल्येसहित रायानें ।
पुजूनियां भव्य वदनें । पुढें त्याचीं निघालीं ॥ ४१ ॥
मुपकारूढ गणेश गोसावी । रायें पूजिला घवघवी ।
करीं मोदक सकळां दावी । पुढें वऱ्हाडी निघाला ॥४२॥

१ राणिवसा, अत पुरात. २ मुनीवरोवर. पाती=वरोवर.

वरी छेत्रें सूर्यपानें । दुभागीं चामरें विराजमानें ।
शृंगारमंडित बहुमानें । मंगळमूर्ति मिरवे ॥ ४३ ॥
छेत्रें पताका विराजत । देव्हडीं चामरें अमित ।
राजपूजा मिरवत । हंसवहनी निघाली ॥ ४४ ॥
गणेश आणी सरस्वती । तयापुढें नेणों किती ।
मंगळतुरें वाजती । गजावरी दमामें ॥ ४५ ॥
छेत्रें पताका अमित । दिव्यरथीं विराजत ।
ब्रह्मयोगी मिरवत । वशिष्ट कुळगुरु निघाला ॥ ४६ ॥
तया पाठीसी विचित्रें । असंख्य चालिलीं विद्यापात्रें ।
दिव्य पताका अमित छेत्रें । ब्राह्मणरथ निघाले ॥ ४७ ॥
धर्म अर्थ मोक्ष काम । निघाले वऱ्हाडी परम ।
तव श्रोतीं अनुक्रम । आशंका घेतली ॥ ४८ ॥
धर्म अर्थ काम वाणी । अगत्य वदे पाणीग्रहणीं ।
मोक्ष नसे उच्चारणी । तरि कां कवि बोलिला ॥ ४९ ॥
रामा जानकी समर्पण । धर्मअर्थकामनिवारण ।
मोक्ष पाहिजे याकारण । मुगुटमणी वऱ्हाडी ॥ ५० ॥
चालिले च्यारी पुरुषार्थ । अग्निदेव मूर्तिमंत ।
गृहस्ताश्रमा साक्षभूत । अति संभ्रमें निघाला ॥ ५१ ॥
छेत्रें सूर्यपानें पताका । कनकमये त्या अनेका ।
सूर्यवंशी जथों निका । वऱ्हाडीभार निघाले ॥ ५२ ॥
उपमा नाहीं वारणाला । दिव्य पाखरां सकळांला ।
कनकभूषणें कनकढाला । चवरडोलीं वऱ्हाडी ॥ ५३ ॥
तया पाठीसी तुरंगभार । पाखरा कनकअळंकार ।
छेत्रें पताका सुंदर । वीर वऱ्हाडी निघाले ॥ ५४ ॥

---

१ सूर्यपान=अब्दागिरी. २ देवढी=अधिक, पुष्कळ. ३ सरस्वती. ४ लग्नसमयीं. ५ कुळोत्पन्न, संघ. ६ चांगला. ७ पाखर=हत्तीघोड्याच्या पाठीवर झालर घालतात ती. ८ चंवरडोल=हौदा.

तया पाठीसी अचाट । रथ चालिले घडघडाट ।
छेत्रें पताका लखलखाट । राजा संभ्रमें निघाला ॥ ५५ ॥
शरीरसमंधी सखे पारिखे । वैभवीं लोक चालिले निके ।
मंत्रीरथाची कौतुकें । कडक भार निघाले ॥ ५६ ॥
माहिपेंत्रें मूर्यापानें । मछपुछें विराजमानें ।
तळपती तेज गहनें । आणी ध्वज रथाचे ॥ ५७ ॥
पुढें तुरांचे विळास । नाना भेरी जिनस जिनस ।
भाट वर्णिती प्रतापास । संभ्रमें वऱ्हाडी निघाले ॥ ५८ ॥
तया पाठीसीं सिविका । छेत्रें पताका लखाका ।
रघुवंशकुळटिळका । माता कौसल्या निघाली ॥ ५९ ॥
सुमित्रा कैकै चौदा शता । राया दशरथाच्या कांता ।
छेत्रें चामरें मंडिता । सिविका त्यांच्या निघाल्या ॥ ६० ॥
सख्या पारिख्या सेवासिनी । पुरीअंगना दिव्य यानीं ।
समस्त निघाल्या वऱ्हाडिणी । माहा संभ्रम पाहावया ॥६१॥
माहां संभ्रमें चालिल्या । वैभवा दाविती आपुलाल्या ।
अष्ट माहां सिधी निघाल्या । समर्था घरीच्या रावत्या ॥६२॥
येश जय प्रताप कीर्ति । हे अयोध्येचीं वेलुतीं ।
राया दशरथाचीं रावतीं । समस्त वऱ्हाडें निघालीं ॥६३॥
चालिलीं द्रव्याचीं भांडारें । पेव्या मांदुसा भांगारें ।
दिव्य वस्त्रें अपारें । साटी च साटी निघाल्या ॥ ६४ ॥
परिमळें धुशरें फुलेलादिक । केर्णें चालिलें अलोलिक ।
राजाज्ञेचें कौतुक । पाहिजे पदार्थ निघाले ॥ ६५ ॥
दशरथभाग्याचें कौतुक । पदार्थ चालिले अलोलिक ।
अनंत ब्रह्मांडाचा नायेक । तो चि जेथें अवतरला ॥६६॥
तेथें काये असे उणें । वैभव वर्णू कोण्या गुणें ।
सकळ सांग वरवेपणें । पुढें वऱ्हाड चालिलें ॥ ६७ ॥

१ माही=छत्री २ शिबिका=पालखी ३ सुवासिनी. ४ " राम " पाठांतर.
५ रावणारे वतनदार. ६ सोनें, द्रव्य ७ साटी=सोबत, ८ जिन्नस.

वऱ्हाड चालिलें गजभारीं । अयोध्या राहिली बहु दुरी ।
पुढें दिसे मिथिळानगरी । परम शोभायमान ॥ ६८ ॥
दिसती ध्वजा आणी पताका । तोरणें झळकती लखाका ।
मंगळतुरांचा भडका । दमामे दणदणां वाजती ॥ ६९ ॥
समस्त दिसे ते समई । आगर बाग आंबराई ।
कालवे पाट ठाईं ठाईं । परिघ कमळीं दाटले ॥ ७० ॥
आगर चंदनाचा सुकाळ । चापे पुष्पांचे परिमळ ।
घेऊन येतसे अनिळें । सुवासें ब्रह्मांड कोंदलें ॥ ७१ ॥
तव ते पातली संध्या वेळा । सूर्य गेला अस्ताचळा ।
पुरीं पाजळिल्या दीपमाळा । हिलाल वऱ्हाडीं लागले॥७२॥
पदातीचे दणदणाट । गजघंटाचे घणघणाट ।
अणी अंदूचे चपेट । तेणें भूमी थरथरी ॥ ७३ ॥
मातल्या उंटांची गडगड । वाजितळांची थडथड ।
वीरभारांची कडकड । पेलें पेलें चालिले ॥ ७४ ॥
खचित पताका माहिपत्रें । त्राहाटिलीं नेणों मयंकपत्रें ।
मछपुछें विचित्रें । भारी झळकती अपारें ॥ ७५ ॥
येक रथांचे घडघडाट । येक औशधांचे भरभराट ।
आगोजांचे धडधडाट । तेणें भूगोळ डगमगी ॥ ७६ ॥
दमामे आणी कर्णे भेरी । जिकडे तिकडे वाजंतरी ।
नफेऱ्या तुतारे वाकेकरी । समस्त वाद्यें वाजती ॥ ७७ ॥
सिविका आणी सुखासनें । आलीं जिनस जिनस यानें ।
मिथिलेबाहेर वनें रानें । भार संभ्रमें मिरवती ॥ ७८ ॥
हिलाल चंद्रजोति अपार । असंख्य दिवट्यांचे भार ।
भाट वानिती वडिवार । सूर्यवंशीमतापा ॥ ७९ ॥

---

१ सुवास. २ अनिल, वायु. ३ मशाली. ४ घोड्यांच्या टापांची. ५ दाटीनें, गर्दीनें ६ त्राहाटणें=वाजविणें, सिद्ध करणें. ७ (?). ८ "ऐशधांचे" पाठांतर (?). ९ आवाजांचे की दारुखान्याचे (?)

ते मिथिळापुरवासी । उभे दुर्गगोपुरासी ।
बोलती आले सूर्यवंशी । व्याही जनकरायाचे ॥ ८० ॥
जनीं बोली त्या काळें । वैकुंठ आणिलें मिथिळे ।
कोण वैभव आगळें । न भूतो न भविष्यति ॥ ८१ ॥
येक ह्मणती रे मिथिळापति । उत्कट सुकृताची संपत्ति ।
त्याचें हें फळप्राप्ती । थोर उत्छाह पाहो ॥ ८२ ॥
वऱ्हाड आलें मिथिळापति । सेवक ह्मणती जि भूपति ।
राया दशरथाची संपत्ति । थोर वैभवें पातला ॥ ८३ ॥
रायें ऐकतां ते मात । थोर उल्हासलें चित्त ।
ऋषी ब्राह्मणा सहित । सकळ सभा आनंदली ॥ ८४ ॥
तव ते मिथिळे बाहेर वऱ्हाड । उतरले वस्तु जाड जाड ।
खचित मंडप जुंबाड । घोस मुक्तरत्नांचे ॥ ८५ ॥
उत्तमासनें विराजत । सुवर्णमय लखलखित ।
सिंह्यासनें जडित । कितीयेक दाटलीं ॥ ८६ ॥
सूर्यवंशी माहांवीर । वशिष्टादि ऋषेश्वर ।
किती बैसले नृपवर । राजसभा घनवटली ॥ ८७ ॥
चुकल्या धना पावे धनिक । किं गतराज्या पावे नायक ।
राम भेटतां सुख । तैसें जालें रायासी ॥ ८८ ॥
कैसल्येसीं सकळ माता । जाल्या आनंदभरिता ।
कोदंडमूर्ति सुंदरा त्या । आळंगिलें समस्तीं ॥ ८९ ॥
सकळां भेटला रघोत्तम । राजा आनंदे परम ।
रामप्रताप अनुक्रम । कौशिकमुखें ऐकिला ॥ ९० ॥
पुढिलिये समासीं सेवंती । राम पूजिल मिथिळापति ।
वेणी ह्मणे सोहळा श्रोतीं । सादर चित्तें परिसावा ॥ ९१ ॥
इति श्री रामायणे आदिकाडे । सीतासैवर समास साहावा ॥ ६ ॥

---

१ तेज. २ सीमत किंवा सीमांत

## ॥ समास सातवा ॥

॥ श्रीरामकर्ता ॥

तो आनंद गाजे मिथिळा । रामा सेवती जना सोहळा ।
तांतडीचा येकवळा । राजे वऱ्हाडी रावती ॥ १ ॥
किती मधानाचे थेंवे । सकळा तांतडी हेलावे ।
राम आणूं चला वरवे । हे चि शब्द मिरवती ॥ २ ॥
स्वयें राजा आनंदभरित । वऱ्हाड लक्ष्मीआळंकृत ।
गज पाखरले अमित । चवरडोल्ढालांसी ॥ ३ ॥
चारु पाखरले तेजोरासी । वऱ्हाडी निघाले संभ्रमेंसी ।
छेत्रें पताका रथेंसी । सिविका स्त्रियादिकांच्या ॥ ४ ॥
केशर आणी कस्तुरीपात्रें । चोवा चंदन फुलेलपात्रें ।
आणी किती रंगपात्रें । परिमळ धुशरें चालिलीं ॥ ५ ॥
द्रव्य चालिलें अपार । संदुक मांदुसा आळंकार ।
दिव्य वस्त्रें अपार । रघोत्तमाकारणें ॥ ६ ॥
पूगीफळें आणी पानें । उत्तम संभ्रमाचीं अन्नें ।
रघुनाथजिभोजनें । रत्नताटें चालिलीं ॥ ७ ॥
धन्य राजा मिथिळापति । मधाना आज्ञा पूर्वीं च होती ।
सर्व सीध वरव्या रीतीं । राजा संभ्रमें निघाला ॥ ८ ॥
जनक राजा वैभवेंसी । घेऊन चालिला सेवतीसी ।
जैसा इंद्र वैकुंठासी । विष्णुपूजे कारणें ॥ ९ ॥
हे हि उपमा निरार्थक । इंद्र असे सेवक ।
राम जावाई विशेष । अंतरभिटी जनकाची ॥ १० ॥
रामा मूळ गजरें । वाद्यें वाजती अपारें ।
दमामे नगारे वाजांतरें । नफेऱ्या बुरुगे चौघडे ॥ ११ ॥

१ एकोपा, संत्र. २ " थोवे " पाठांतर. ३ घोडे. ४ चोहा, चंदनाची उटी किंवा चंदनी अत्तर. ५ फुलेल=अत्तर. ६ सुपाऱ्या.

मिथिले आंत बाहेर । दिवट्या हिलालाचे भार । ,
चंद्रजोती अपार । यानें विमानें भासती ॥ १२ ॥
छत्रें सूर्यापानें-पताका । सुवर्णध्वजा त्या अनेका ।
मंगळतुरांचा कडका । मिथिले बाहेर आले ॥ १३ ॥
दोहीं दळींचा वाद्यघोष । तेणें उलों पाहे आकाश ।
शेषाचिया श्रवणास । तधीं टाळें बैसलें ॥ १४ ॥
तुरें नव्हे तें कर्कशें । सुरसें आणी बहुवसें ।
शेषा रुचली विशेषें । नादें कर्ण मंदावले ॥ १५ ॥
हवाया नळे चंद्रजोति । नाच गायनें विराजती ।
अति संभ्रमें सेवती । रघुनाथजि आणिली ॥ १६ ॥
अयोध्यापति सन्मानें । पुढें आला बहुमानें ।
प्रीतिवचनार्चीं नमनें । परस्परें भेटले ॥ १७ ॥
मिथिळें नमिलें वशिष्ठ ऋषी । अनुक्रमें श्रेष्ठ श्रेष्ठासीं ।
परस्परें सन्मानेंसी । व्याही वऱ्हाडी बैसले ॥ १८ ॥
ते जानकीची जननी । कौसल्येनें सन्मानुनी ।
समस्त हि वऱ्हाडिणी । अति संभ्रमें बैसल्या ॥ १९ ॥
शतानंद ह्मणे राया । रामपूजा या समया ।
करावी जि नृपवर्या । ऋषी ब्राह्मण बोलती ॥ २० ॥
सकळ मंगळाचें मंगळ । सर्व सुखाचें हें फळ ।
राया तुझें भाग्य सफळ । राम जावाई जोडला ॥ २१ ॥
राजा पाहे मदनमूर्ति । रूपें हरल्या चित्तोवृत्ति ।
रामीं तन्मये मनोगति । उगा चि तेव्हां बैसला ॥ २२ ॥
मदनमूर्ति स्वानंदघन । सकळ भूषणीं विराजमान ।
दिव्यांबरें परिधान । भुवनसुंदर रूपडें ॥ २३ ॥
जनकें देखतां सुखमूर्ति । अंतरवृत्ति हि अंतुति[1] ।
रामरूपीं भरली प्रीति । मिठी जडोन तद्रूप ॥ २४ ॥

---

१ " आतुती " पाठांतर. अशुद्ध ( ? )

सुखें दाटलें अंतर । येक मन तें रामाकार ।
त्याच्या मोहरें[1] हें शरीर । नेत्रपातें हालेना ॥ २५ ॥
सुखाकार जालें चित्त । राम पूजावा ना उठे[2] हेत ।
च्यारि देह तटस्थभूत । फिरली दृष्टी झांकली ॥ २६ ॥
ते समईचा गजर । सकळ करिती जयजयकार ।
प्रेमळ भक्त अपार । जनकमिळणीं मिळाले ॥ २७ ॥
शतानंदादि ऋषीजन । ह्मणती राया सावधान ।
सुंदर शाम रघुनंदन । पूजी पूजा पाहों दे ॥ २८ ॥
राजा परमानंदें सादर । रामपूजेसी तत्पर ।
सीरोवेष्टणाचा पदर । कंठप्रदेशीं घातला ॥ २९ ॥
ब्राह्मण मंत्राच्या गजगजा । कर जोडून जनक राजा ।
संकल्प सोडिला मग पूजा । रामापुढें समर्पिली ॥ ३० ॥
वचनें बोलें गुज गहंनें । ह्मणे हे पूजा रघुनंदनें ।
अंगिकारावी बहुमानें । मज दासाची ये काळीं ॥ ३१ ॥
देवभक्तांची खूण मोठी । देखोनि आह्मेची दृष्टी ।
इतरां ते अलभ्य गोष्टी । रायें पूजा अरंभिली ॥ ३२ ॥
जांबुर्नदाचा[4] पिकिला रस । मस्तकीं लपेटिला जिनस ।
नीळ तनु ते राजस । अतिशयेंसी शोभला ॥ ३३ ॥
रत्न किळाचें ठेवणें । त्यावरि झळके ते मिरवणें ।
मकरकुंडलें बरवेपणें । कोमळ कर्णीं साजलीं ॥ ३४ ॥
सकळ तेजाचें स्थान । रायें उकलिलें पीत वसन ।
ह्मणे आतां परिधान । जगजीवनें करावें ॥ ३५ ॥
नीळ तनु बरवंट[5] । परिधान केला पीत पट ।
सुंदर साजिरा तो कंट[6] । दिव्य मेखळा शोभली ॥ ३६ ॥

---

१ मोहर=मार्ग. मोहरणें=शिरणें. २ " उठेना " पाठांतर. ३ " घनें " पाठांतर. ४ जांबूनद=सुवर्ण. धोतऱ्याचें फळ असा हि एक अर्थ आहे. ५ मनोहर. ६ कटी.

ते मेखळा तेज गहना । किंकिणी शेजारीं शोभायमाना ।
मग त्या रायें हृदयस्थाना । दिव्य पदक वाइलें ॥ ३७ ॥
अनर्घ्य माळा रत्नहार । कंठीं घातले सुंदर ।
नाना भूपणें मनोहर । बाहुदंडा शोभलीं ॥ ३८ ॥
तेजोरासी वीरकंकणें । रायें वाइलीं करभूपणें ।
अनर्घ्य मुद्रिका वरवेपणें । आंगोळिकें दाटलीं ॥ ३९ ॥
मग तें दिव्य पेंटें चोखटें । उकलिली लखलखाटें ।
नीळ तनु वरवंटें । राजवस्त्रें[१] राजलीं[२] ॥ ४० ॥
मग त्या नवरत्नाच्या माळा । आपादपरियंत घातल्या गळा ।
खचित पदक हृदयकमळा । अति शोभतें जालें ॥ ४१ ॥
जें विश्रांतीचें राहातें स्थळ । सुखाचें अधिष्ठान केवळ ।
रामपाउलें सुनीळ । जनकें भूपणें पूजिलीं ॥ ४२ ॥
पदीं भूपणें तेजोरासी । अंदु नेपुरें जिनस जिनसी ।
वाकीं वाळे संभ्रमेसीं । नवरत्नाचीं कोंदणें ॥ ४३ ॥
रत्नचौकीचयावरी । मुक्तकिळाची कुसरी ।
सुंदर पाउलें साजिरीं । पायें जोडा शोभला ॥ ४४ ॥
अभिनव संपत्तीची थोराई । आणी आवडीची नवाई ।
विशेप राम जावाई । आश्चिर्य जनकपुजेचें ॥ ४५ ॥
मग त्या सुंदरा मुखकमळा । किंचित कस्तुरी रेखिला टीळा ।
सुरंग अक्षता विमळा । तयावरी झळकती ॥ ४६ ॥
सुगंध लाविलें कुसरी । पूजिलें परिमळ धुसरी ।
मग जनकें परोपरी । सुमनमाळा घातल्या ॥ ४७ ॥
सदा अभया उदित । भूपणमंडित विराजत ।
जनकरायें श्रीमंत । करीं तांबोल दिधला ॥ ४८ ॥
होते पूजेची श्रीमंतता । आणी भक्तीची रसाळता ।
जनकें वैकुंठीच्या दैवता । वश्य आणिले यालागीं ॥ ४९ ॥

---

१ वस्त्रें. २ शोभलीं.

ऋषी ब्राह्मण तापसी । समस्त हि स्वर्गवासी ।
तटस्थ रामपूजेसी । प्राणिमात्र लोधले ॥ ५० ॥
भुवनसुंदरा कौसल्यात्मजा । षोडष उपचाराच्या गजगजा ।
जनकराजभक्तपूजा । राजाधिराजा राजली ॥ ५१ ॥
राम पूजिला विधियुक्त । राजा आनंदें भरित ।
मग वशिष्ठ पुरोहित । त्याची पूजा मांडली ॥ ५२ ॥
नमस्कारिलें उपाध्यासी । अमोल्यें वस्त्रें दिलीं त्यासी ।
मग आभरणें विळासी । साजती रायें वाइलीं ॥ ५३ ॥
फुलेलें आणी गंधाक्षतें । परिमळ धुशरें अमितें ।
पुष्पमाळा येथोचितें । अपार दक्षणा दियली ॥ ५४ ॥
जनकरायाचे आवशक । लक्षानलक्ष राजकी लोक ।
पूजापात्रेंसी अनेक । ऋषी ब्राह्मण पूजिले ॥ ५५ ॥
वस्त्रें भूषणें सकळांसी । सांग पूजिलें ब्राह्मणासी ।
तांबोल वाटिले हेमेंरासी । दक्षणे द्रव्य लोटलें ॥ ५६ ॥
बावनकसाचीं नाणीं । ठसिलें सुंदरें कोडिसवाणी ।
विस्तीर्ण पात्रें ते क्षणीं । भरभरूनि दान वांटिलें ॥ ५७ ॥
ते दक्षणा तेजपुंज । पावोन संतुष्ट द्विजराज ।
त्रिभुवनगृहस्तें रघुराज । मंत्राक्षतीं पूजिला ॥ ५८ ॥
राये राय श्रीमंतता । पूजा जाल्या येथोचिता ।
उभय दळींच्या अमिता । बधु मान पावल्या ॥ ५९ ॥
बहु गौरव उत्तरें । बहु स्तुति परस्परें ।
बहु प्रीतिचेन भरें । मग समस्त उठिले ॥ ६० ॥
दोहीं दळींचीं मंगळतुरें । कडक लागलीं अपारें ।
जिकडे तिकडे वाजांतरें । दमामे कर्णे नफेऱ्या ॥ ६१ ॥
आणी कितेक जिनसें । वाद्यें वाजती सुरसें ।
दोहीं रायांचीं बहुवसें । जिकडे तिकडे आनंद ॥ ६२ ॥

---

१ दागिने. २ हेम=सुवर्ण ३ सुवर्णांचीं. ४ मनोहर. ५ श्रीरामाला हें विशेषण श्रीसमर्थप्रतापात हि दिलें आहे ?.

दोही रायांच्या ब्रीदावळी । भाट वानिती ते काळीं ।
पिढ्यानपिढी वंशावळी । पवाड वर्णित चालिले ॥ ६३ ॥
राया दशरथाचें वऱ्हाड । वस्तु मिरवे जाड जाड ।
सेना चत्वार जुंवाड । खचित भूषणें तयाचीं ॥ ६४ ॥
पुढें गजांचे गजभार । चवरडोलीं माहा वीर ।
शृंगारमंडित अपार । वाजी वऱ्हाडी चालिले ॥ ६५ ॥
खचित रथ तेजपुंज । छेत्रें पताका विराज ।
ज्याचे प्रभेपुढें लाज । वाटोन सूर्य मावळला ॥ ६६ ॥
च्यारि वारु[1] वरवेपणें । मनोगतीचा कारणें ।
सभ्य सात्विक लक्षणें । विळास रथीं शोभले ॥ ६७ ॥
जनक आवडीचे निवट्टन । नेणों मानसपूजेचे काढून ।
प्रतक्ष दाविले आणून । भूमंडळीं तों हें नाहीं ॥ ६८ ॥
त्या रथाचें सुंदर्य । राया जनकाचें तात्पर्य ।
अंतरप्रीतीचें कार्य । भक्तिरूपें ओतला ॥ ६९ ॥
सर्वापरी विराजमान । सुरा असुरा[2] गहन ।
कुरवंडी त्यावरून । इंद्रपुरी टाकिली ॥ ७० ॥
सुंदर शाम मदनमूर्ति । राम शोभला ते रथीं ।
तेथें सुमंत सारथी । अति चतुर वैसला ॥ ७१ ॥
शत्रुघ्न आणी सौमित्र । चामरें ढाळिती मानसपुत्र ।
विडिया देतसे भरथ । पीकपात्री तो सुरपति ॥ ७२ ॥
वशिष्ठादि ऋषीवर । शुकादि योगेश्वर ।
दिव्य रथीं नामधार । रामरथा पाठीसी ॥ ७३ ॥
दश ग्रंथांचें नवल काये । वेदभाषाचे निर्णये ।
अपर सूर्य समुदाये । ब्राह्मणरथ चालिले ॥ ७४ ॥
तया पाठीसी अयोध्यापति । कनकरथा नाहीं मिति ।
पृथ्वीराजे नेणों किती । वरवऱ्हाडी चालिले ॥ ७५ ॥

---

[1] लढाईचे घोडे, [2] "आश्चर्य" पाठांतर.

छेत्रें पताका तेजपुंज । खचित झळकती रथध्वज ।
माहिमुखें घोर तेज । मछपुछें तळपती ॥ ७६ ॥
तया पाठीसी अमिता । छेत्रें पताका बहुता ।
कौसल्यादि राजकांता । सिविका त्यांच्या चालिल्या ॥७७॥
तया पाठीसी भार । अष्ट माहासिधींचे उपचार ।
नाना वस्तु अपार । जाड जाड चालिली ॥ ७८ ॥
ते समईचीं आवेशें । दोहीं दळींचीं बहुवसें ।
तुरें वाजती जिनसजिनसें । जिकडे तिकडे सोहळा ॥ ७९ ॥
जनकराज ते अवसरीं । पुढें चाले वेत्रधारी ।
रामरथ गजभारी । थीर[1] थीर मिरवे ॥ ८० ॥
दिवट्या हिलाल नेणों किती । अमित लागल्या चंद्रजोति ।
रामरथाची विशेष दीप्ती । तेजपुंज विराजे ॥ ८१ ॥
ते रथीं मेघडंबरें[2] । चंद्रासारिखीं मनोहरें[3] ।
मुक्ताफळांची झल्लरें । झुबके रत्नमणीचे ॥ ८२ ॥
देवांगवस्त्रें पाळें छेत्रें । रथीं झळकती विचित्रें ।
तेजोरासी माहिपत्रें । मछपुछें तळपती ॥ ८३ ॥
सुंदर रथीं सुंदर मूर्ति । नाना उपचार जाणविती ।
पुष्पें घेनें[4][5] अंथरती । रथ वरून जातसे ॥ ८४ ॥
पुढें भाट वंदिजन । चरित्रप्रताप वर्णिती गहन ।
ब्रीदावळी शोभायमान । देवाधिदेवा तोषविती ॥ ८५ ॥
पुढें त्या अष्ट नायका । नाच होतसे निका ।
रागरंगाच्या धमका । मात हों[6] हों जातसे ॥ ८६ ॥
थवे थवे गंधर्वाचे । रथ थोकता नाच त्याचे ।
तों भरभराट औशधांचे । कर्णे भेरी वाजती ॥ ८७॥

---

१ हळु हळु. २ मेघडंबरी=उंच छत्री, घुमट. ३ " अपारें " पाठांतर. ४ समूह. ५ " घेऊन " पाठांतर. ६ " होत हो " पाठांतर. ७ हा शब्द मागच्या समासांत हि आला आहे. " ऐशध " असा सर्वत्र त्याऐवजीं पाठ आहे. त्याचा अर्थ कळत नाहीं ?

ते समई येक्या सेवटें । लागलीं चंद्रजोतीचीं थाटें ।
हवाया नळे भरभराटे । औशधकळा गाजली ॥ ८८ ॥
औशधफुलाची कौतुकें । हातनळे येथासुखें ।
हवाया चालिल्या हरिखें । व्योम कवळूं धाविल्या ॥ ८९ ॥
थोर गजांचे किंकाट । वाजी हिंसती तळ चपेट ।
दमामे चौघडे दणदणाट । भूमीं थरके ते काळीं ॥ ९० ॥
रामरथ चाले धीर । जनक पुढें काठीकार ।
प्रधान राजे इतर । दाटी पुढें वारिती ॥ ९१ ॥
दोन्हीं दळींचें कौतुक । राममिरवण अलोलिक ।
पाहावया तिन्ही लोक । सुखें स्वानंदें दाटले ॥ ९२ ॥
पेठा पेठा वाजार । जन दाटले अपार ।
सुंदर शाम जगदीश्वर । राम पाहाती दुभागी ॥ ९३ ॥
ध्वज ध्वजासीं झगटती । छेत्रें छेत्रासी घसटती ।
रथ रथासी ठेलिती । राम पाहायाकारणें ॥ ९४ ॥
देवीं दाटलें अंवर । सकळ करिती जयजयकार ।
पुष्पें वर्षती सुरवर । रामरथा ते काळीं ॥ ९५ ॥
उभय भाग्याचें वरवेंपण । पाहाती आश्चिर्य सुरगण ।
ह्मणती कोण हे मिरवण । न भूतो न भविष्यति ॥ ९६ ॥
तव तें झळके पुरद्वार । कनकमणींचें सुंदर ।
तोरणें मुक्तांची अपार । घोंस घोंस झमकती ॥ ९७ ॥
रत्नखचित कपाटें । उघडलीं घडघडाटें ।
रामरथ त्यांची नेटें । वऱ्हाड पुरी प्रवेशले ॥ ९८ ॥
पुरीआंत सोहळा । जिकडे तिकडे दीपमाळा ।
मुक्तरत्नाच्या रंगमाळा । रामरथा घातल्या ॥ ९९ ॥
प्रांतःकाळाच्या समया । गगन कवटाळिती हवाया ।
चंद्रजोतीच्या नवाया । औशधें फुलें वहुसाल ॥ १०० ॥

दमामे कर्णे चौघडे । अनेक वाद्यें वाजती पुढें ।
नफेऱ्या बुरुगें जिकडें तिकडे । परिमळ धुशरें उधळती ॥१॥
जनकरायाची आवडी । नाना विळास धेरवडी ।
रथ थोके घडी घडी । नाच गायनें विळास ॥ २ ॥
राम मिरवे स्वानंदघन । जना आनंद गहन ।
कां तो हृदयस्त जगजीवन । विश्व सुखें दाटले ॥ ३ ॥
हे चि वोली सर्व जनीं । धन्य कौसल्या जननी ।
आणी जनकाची नंदनी । रामवामांग लाधली ॥ ४ ॥
पुरीजन आणी वऱ्हाडी । त्रैलोक्य पाहे परवडी ।
रामरथा चढोचढी । वोवाळण्या पडताती ॥ ५ ॥
सकळां आनंद परिपूर्ण । पुष्पें वर्षती सुरगण ।
जाली संभ्रमें मिरवण । जानवसां आणिले ॥ ६ ॥
त्या जानवसाची रचना । धिकारिते इंद्रभुवना ।
पाहातां वैभव महिमाना । विष्णुपुरी अवतरली ॥ ७ ॥
तव ते राजे सूर्यवंशी । कदां न चुकती नीतीसीं ।
पुढें केलें पूर्वजासी । सूर्य जानवसां प्रवेशला ॥ ८ ॥
त्याउपरी राजभार । थोकोनि राहिला अपार ।
जनकजावाई रघुवीर । रथाखालते उतरले ॥ ९ ॥
लक्षानलक्ष वधुजनें । कनकताटीं शोभायमानें ।
कर्पुराचीं नीरांजनें । रघुनाथजि आणिलीं ॥१०॥
वोवाळिती सुलक्षणा । सुंदरवदन वरवेपणा ।
कोटी मदन निंबलोणा । वोवाळून सांडिले ॥ ११ ॥
जेथें वसे रघुपति । तेथें रमा वागती ।
अष्ट माहासिधी रावती । काये ह्मणोनि वर्णावें ॥ १२ ॥
परमानंदे मिथिळेश्वर । जानवस्या रघुवीर ।
रायासहित अपार । वरवऱ्हाडी आणिले ॥ १३ ॥

---

१ प्रकार.

कनकमंडप दिव्यासनें । उत्तमें उत्तमें वरासनें ।
रायें रायें सन्मानें । वरवऱ्हाडी बैसले ॥ १४ ॥
वरवऱ्हाडी मानकरी । रायें तार्तिम्य सकळांपरी ।
येथासांग उपचारी । जानवसें दिधले ॥ १५ ॥
परस्परें जालीं नमनें । वशिष्ठ नमिला वहुमानें ।
राजा मिथिळ संभ्रमानें । आपुल्या मंडपा आला ॥ १६ ॥
पुढिलिये समासीं हळदी । देवकप्रतिष्ठा येथाविधि ।
वेणीस्वामी मंगळनिधी । रुखवत पूजा जनकाची ॥ ११७ ॥

॥ इति श्री रामायणे आदिकांडे सीतास्वैवर समास ॥ ७॥

---

## ॥ समास आठवा ॥

॥ श्रीरामकर्ता ॥

वऱ्हाड संभ्रमें मिरवलें । रम्य जानवसां राहिलें ।
सकळां तार्तम्य पावलें । दिन प्रशस्त उगवला ॥ १ ॥
केशरकस्तुरीचे सडे । मुक्तरांगोळ्या जिकडे तिकडे ।
दोहीं मंडपीं चढें चढें । स्नानें दानें रायाचीं ॥ २ ॥
ऋषी तापसी माहानुभाव । समस्त ब्राह्मणसमुदाव ।
दोहीं मंडपीं उछाव । काय ह्मणोनि वर्णावा ॥ ३ ॥
दोहीं मंडपींची शोभा । येक वैकुंठ येक इंद्रसभा ।
राया दशरथा घरीं सुलभा । अष्ट माहासिधी रावती ॥४॥
वरा हळदी गजर । विचित्र पूजेचे संभार ।
आंत वाहेरी अपार । देवस्त्रियांची दाटणी ॥ ५ ॥
मग त्या राजवधु वरा । सुवासिनी नागरा ।
कौसल्यात्मजा रघुवीरा । अक्षवाणें केलीं ॥ ६ ॥

---

१ " सुंदरा " पाठांतर.

तेल वांवें पांचजणीं । फुलेलें चाफेलें घेउनि ।
वशिष्ठभाजा उपाधिणी । माना पुढें ते जाली ॥ ७ ॥
वरा तेल वाहावया । शिवभाजा विधिजाया ।
गाईत्री सावित्री उभिया । सुरेंद्रपत्नी पांचवी ॥ ८ ॥
तेल वाहतां पांचजणीं । आशीर्वादाचीं बोलणीं ।
भुवननाथा च्यापपाणी । सुखें राज्य करावें ॥ ९ ॥
पांचाजणी वरव्यापरी । तेल वाइलें मंगळोत्तरीं ।
नीळ कुंतळा पुष्टीवरी । नागचांपे पसरले ॥ १० ॥
जो विधीस ध्यानीं न फावे । शिव नामें चि समजावे ।
राहिले सर्वांचे थोरावे । त्या वरवंटा माखिती ॥ ११ ॥
मग त्या मदनमूर्ति रघुवीरा । हळ्दी लाविती सुंदरा ।
नीळ तनु मनोहरा । नाना विळासी उटिती ॥ १२ ॥
सुवर्णतंतु हेमकळस । सुतिले शोभेचे विळास ।
त्यामध्यें चवकीर्स । जानकीवर विराजे ॥ १३ ॥
कनकपात्रें भरलीं किती । विस्तीर्ण जळें विसाविती ।
अष्ट माहासिधी रावती । मंगळ स्नान प्रभूचें ॥ १४ ॥
मग ते सुगंध चोखंणी । श्रीमंत कुंतळा लाउनी ।
परम मंगळा सुवासिनी । उदक घालिती खळखळा ॥ १५ ॥
नाना संभ्रमें कुसरी । उदक घालिती सुंदरी ।
विमळ तनु ते साजिरी । विमळपणें विराजे ॥ १६ ॥
मंगळनिधीं मंगळ सोहळा । त्रैलोक्य पाहों टाकलें डोळा ।
मंगळतुरांचा येकवळा । नभीं दुंदुभी दणाणिती ॥ १७ ॥
संभ्रमाचें मंगळ स्नान । जालीं वस्त्रें परिधान ।
कुंकुमटिळक शोभायमान । आरत्या करिती निजमाता ॥ १८ ॥

---

१ वाहावें. २ " घेऊन उभ्या कोणी " पाठांतर. ३ " वातां " पाठांतर=वाहतां. ४ कुंतल=केश. ५ सुतिणे=ओवणे (?) ६ चवक=आश्चर्य. ७ उटी.

ते चिं हळदी राजकुमरी । लागली तुरांचा गजरी ।
दोहीं मंडपीं बहुपरी । उछाह गाजे हळदीचा ॥ १९ ॥
दोहीं मंडपीं मंगळ स्नानें । जालीं समस्तां शोभायमानें ॥
मग तें वाटलीं वायनें । ढिगें ढीग शर्करा ॥ २० ॥
दोहीं मंडपीं थाटें थाट । पीतांबरें तगतगाट ।
अळंकारांचे लखलखाट । स्वासिनी वायनें नेताती ॥ २१ ॥
त्या मंगळनिधीचा मंदिरीं । उछाह गाजे बहुपरी ।
ब्राह्मण आंत बाहेरी । जिकडे तिकडे गजगज ॥ २२ ॥
कोंदाटलेंसे राजद्वार । तुरें वाजती अपार ।
सभामंडपीं माहावीर । वरवऱ्हाडी दाटले ॥ २३ ॥
दिव्य सिंह्यासनीं भूपति । राया आनंद न माये चित्तीं ।
राम पुढें मदनमूर्ति । चौघे पुत्र बैसले ॥ २४ ॥
घनवटली सभामंडळी । सूर्यवंशी माहाबळी ।
पृथ्वीराजे ते काळीं । मंत्री समस्त बैसले ॥ २५ ॥
कौशिकादिक राजऋषी । नारदादि देवऋषी ।
शुकादि सुखरासी । माहानुभाव बैसले ॥ २६ ॥
बैसले तेजोरासी सुलक्षण । पुण्यमूर्ति विचक्षण ।
चहुं वेदींचे ब्राह्मण । अपार सभे दाटले ॥ २७ ॥
ब्रह्मनिष्ठां मुगुटमणी । मुक्तपणा वेद वर्णी ।
ज्याचा महिमा ऐकतां कर्णीं । सत्पात्र होइजे ॥ २८ ॥
तो वशिष्ठ माहाराज । लग्नपत्रिका मंगळबीज ।
शुध अक्षरें तेजपुंज । सीध केली तत्काळ ॥ २९ ॥
मुनि बोले अयोध्याधीपा । पत्रिका जावी वधुमंडपा ।
देवकप्रतिष्ठे समीपा । पूजन केलें पाहिजे ॥ ३० ॥
राजा सांगे मुनिवरा । पत्रिकापूजन वरवें करा ।
भरथ शत्रुघ्न कुमरा । आणी अगस्ती पाठवा ॥ ३१ ॥
वशिष्ट बोले भूपति । पत्रिका पूजूं तुझा हातीं ।
हंसवहनी वरव्या रीती । अति संभ्रमें पाठवा ॥ ३२ ॥

सभामंडपीं मंत्रघोप । विधियुक्त पत्रिकेस ।
पुजूनिया ब्राह्मणांस । अपार द्रव्य वांटिलें ॥ ३३ ॥
राया दशरथाच्या करें । पत्रिका पूजिली गजरें ।
छत्रें चामरें मंगळतुरें । सरस्वती मिरवे ॥ ३४ ॥
अति संभ्रमें पत्रिका । अगस्ती मुनि मंगलिका ।
घेऊन आला जनका । उल्हास चित्ता नावरे ॥ ३५ ॥
नमस्कारिला अगस्ती ऋषी । वहु सन्मान राजपुत्रासी ।
अनुक्रमें सकळांसी । वैस वैसकार जाले ॥ ३६ ॥
राजा संतोपला मनीं । दोघे राजपुत्र देखोनि ।
अति उल्हासें करूनि । अगस्तीसीं वोलतु ॥ ३७ ॥
मुनि आश्चिर्य पाहे कोण । राजपुत्र हे सुलक्षण ।
पाहातां रूपाचें वरवेपण । रामासारिखे भासती ॥ ३८ ॥
अगस्ती वदे मिथिळनाथा । तूं वोलिलासी नव्हे अन्यथा ।
कोण भाग्य दशरथा । रायाचें हें कळेना ॥ ३९ ॥
मग तो वशिष्ठ वंधु खचितपात्रीं । दिव्याक्षरें चित्रविचित्रीं ।
लग्नपत्रिका ब्राह्मणमंत्री । रायाकरीं दिधली ॥ ४० ॥
पत्रिका घेऊन करीं । अत्यादरें मस्तकीं धरी ।
शुभ सन्मानें वहुपरी । पूजा तार्तम्यें जालें ॥ ४१ ॥
राजपुत्र सन्मानें । गौरविले वहुमानें ।
अनुक्रमें पूजामानें । रायें गौरव दिधलें ॥ ४२ ॥
वहु सन्मानें राजसुत । गजभारें मिरवत ।
अगस्तीऋपीसमवेत । आपुल्या मंडपा आले ॥ ४३ ॥
मग दोहीं मंडपीं देवदेवकें । चढचढें कौतुकें ।
पाहाया दाटलीं अनेकें । विमानें नभीं देवांचीं ॥ ४४ ॥
फुलेलें चंदन कुसरी[1] । दोहीं मंडपीं वरच्यापरी ।
अभ्यांगें जालीं मंगळतुरीं । ऋपी ब्राह्मण रायाचे ॥ ४५ ॥

---

१ " कस्तुरी " पाठांतर.

सकळ सिधीचा नायक । तो चि जेथें कुळदीपक ।
सकळ सांग अलोलिक । देवकप्रतिष्ठा जाली ॥ ४६ ॥
जाली देवकप्रतिष्ठा । वशिष्ठां आदि वरिष्ठां ।
राजगौरव जालें श्रेष्ठां । लखलखाट दाटलें ॥ ४७ ॥
ज्याचे ग्रामीं चहुंकडे । चिंतामणी जिकडे तिकडे ।
रानोमाळे परीस खडे । कोण पुसे तयांसीं ॥ ४८ ॥
जेथें वास रघोत्तमा । तें भाग्य निरोपमा ।
सुखसंपत्ति सांडिली सीमा । जिकडे तिकडे गजगज ॥४९॥
अपार कनकाचिया रासी । वाटिलिया त्या समयासी ।
मुक्कें रत्नें ब्राह्मणांसीं । कैपी विशेष दिधलिं ॥ ५० ॥
अपार जालें तेव्हां दान । येथें बोलिलें सामान्य ।
पुढिल्या धाकाराचें मान । विरंग होईल ह्मणोनि ॥ ५१ ॥
दोहीं मंडपीं देवदेवकें । वैसलीं थोर कौतुकें ।
ब्राह्मणपूजा येथासुखें । गौरव धाकार जाले ॥ ५२ ॥
समस्त संतुष्ट धाकारें । सकळां पावलीं वस्त्रें चिरें ।
तव ते पाक जाले गजरें । समस्तीं स्नानें सारिलीं ॥ ५३ ॥
मंडपीं वैसल्या पंग्ती । वशिष्ठादि पुण्यमूर्ति ।
सकळ ब्राह्मण भूपति । वर वऱ्हाडी मंत्री वैसले ॥ ५४ ॥
तव ते राजपुत्र विराज । बंधुसहित रघुराज ।
मध्यें मंडळी तेजपुंज । दिव्यासनीं शोभतसे ॥ ५५ ॥
रत्नदीपावळी अपारा । अळंकाराच्या फांकती तारा ।
मंगळराज नोवरा । परम शोभायमान ॥ ५६ ॥
पीतांवराच्या फांकती कीळा । तेजलहरीचा झळाळा ।
आणी मुक्तमणीच्या रंगमाळा । ढाळें तेज हेलावे ॥ ५७ ॥

---

१ " गावीं " पाठातर. २ " रानें माळें " पाठातर. ३ " श्रुंती " पाठातर. ४ " दिधलें " पाठातर. ५ " पाती " पाठातर. ६ प्रभा. ७ प्रभा, प्रकाश.

सभामंडपीं मंत्रघोष । विधियुक्त पत्रिकेस ।
पुजूनिया ब्राह्मणांस । अपार द्रव्य वांटिलें ॥ ३३ ॥
राया दशरथाच्या करें । पत्रिका पूजिली गजरें ।
छत्रें चामरें मंगळतुरें । सरस्वती मिरवे ॥ ३४ ॥
अति संभ्रमें पत्रिका । अगस्ती मुनि मंगळिका ।
घेऊन आला जनका । उल्हास चित्ता नावरे ॥ ३५ ॥
नमस्कारिला अगस्ती ऋषी । बहु सन्मान राजपुत्रासी ।
अनुक्रमें सकळांसी । बैस बैसकार जाले ॥ ३६ ॥
राजा संतोषला मनीं । दोघे राजपुत्र देखोनि ।
अति उल्हासें करूनि । अगस्तीसीं बोलतु ॥ ३७ ॥
मुनि आश्चिर्य पाहे कोण । राजपुत्र हे सुलक्षण ।
पाहातां रूपाचें बरवेपण । रामासारिखे भासती ॥ ३८ ॥
अगस्ती बदे मिथिळनाथा । तूं बोलिलासी नव्हे अन्यथा ।
कोण भाग्य दशरथा । रायाचें हें कळेना ॥ ३९ ॥
मग तो वशिष्ठ बंधु खचितपात्रीं । दिव्याक्षरें चित्रविचित्रीं ।
लग्नपत्रिका ब्राह्मणमंत्री । रायाकरीं दिधली ॥ ४० ॥
पत्रिका घेऊन करीं । अत्यादरें मस्तकीं धरी ।
शुभ सन्मानें बहुपरी । पूजा तार्तम्ये जालें ॥ ४१ ॥
राजपुत्र सन्मानें । गौरविले बहुमानें ।
अनुक्रमें पूजामानें । रायें गौरव दिधलें ॥ ४२ ॥
बहु सन्मानें राजसुत । गजभारें मिरवत ।
अगस्तीऋषीसमवेत । आपुल्या मंडपा आले ॥ ४३ ॥
मग दोहीं मंडपीं देवदेवकें । चढचढें कौतुकें ।
पाहाया दाटलीं अनेकें । विमानें नभीं देवांचीं ॥ ४४ ॥
फुलेलें चंदन क्रुसरी । दोहीं मंडपीं वरव्यापरी ।
अभ्यांगें जालीं मंगळतुरीं । ऋषी ब्राह्मण रायाचे ॥ ४५ ॥

---

१ " कस्तुरी " पाठांतर.

सकळ सिधीचा नायक । तो चि जेथें कुळदीपक ।
सकळ सांग अलोलिक । देवकप्रतिष्ठा जाली ॥ ४६ ॥
जाली देवकप्रतिष्ठा । वशिष्ठां आदि वरिष्ठां ।
राजगौरव जालें श्रेष्ठां । लखलखाट दाटलें ॥ ४७ ॥
ज्याचे ग्रामीं चहुंकडे । चिंतामणी जिकडे तिकडे ।
रानोमाळें परीस खडे । कोण पुसे तयांसीं ॥ ४८ ॥
जेथें वास रघोत्तमा । तें भाग्य निरोपमा ।
सुरसंपत्ति सांडिली सीमा । जिकडे तिकडे गजगज ॥४९॥
अपार कनकाचिया रासी । वाटिलिया त्या समयासी ।
मुक्तें रत्नें ब्राह्मणांसी । रूपी विशेष दिधलिं ॥ ५० ॥
अपार जालें तेव्हां दान । येथें बोलिलें सामान्य ।
पुढिल्या धाकाराचें मान । विरंग होईल ह्मणोनि ॥ ५१ ॥
दोहीं मंडपीं देवदेवकें । बैसलीं थोर कौतुकें ।
ब्राह्मणपूजा येथासुखें । गौरव धाकार जाले ॥ ५२ ॥
समस्त संतुष्ट धाकारें । सकळां पावलीं वस्त्रें चिरें ।
तव ते पाक जाले गजरें । समस्तीं स्नानें सारिली ॥ ५३ ॥
मंडपीं बैसल्या पंग्ती । वशिष्ठादि पुण्यमूर्ति ।
सकळ ब्राह्मण भूपति । वर वऱ्हाडी मंत्री बैसले ॥ ५४ ॥
तर्व ते राजपुत्र विराज । बंधुसहित रघुराज ।
मध्यं मंडळी तेजपुंज । दिव्यासनीं शोभतसे ॥ ५५ ॥
रत्नदीपावळी अपारा । अळंकाराच्या फांकती तारा ।
मंगळराज नोवरा । परम शोभायमान ॥ ५६ ॥
पीतांबराच्या फांकती कीळा । तेजल्हरीचा झळाळा ।
आणी मुक्तमणीच्या रंगमाळा । ढाळें तेज हेलावे ॥ ५७ ॥

---

१ " गावीं " पाठांतर. २ " रानें माळें " पाठांतर ३ " त्रुसी " पाठांतर. ४ " दिधलें " पाठांतर. ५ " पाती " पाठांतर. ६ प्रभा. ७ प्रभा, प्रकाश.

सभामंडपीं मंत्रघोष । विधियुक्त पत्रिकेस ।
पुजूनिया ब्राह्मणांस । अपार द्रव्य वांटिलें ॥ ३३ ॥
राया दशरथाच्या करें । पत्रिका पूजिली गजरें ।
छेत्रें चामरें मंगळतुरें । सरस्वती मिरवे ॥ ३४ ॥
अति संभ्रमें पत्रिका । अगस्ती मुनि मंगळिका ।
घेऊन आला जनका । उल्हास चित्ता नावरे ॥ ३५ ॥
नमस्कारिला अगस्ती ऋषी । बहु सन्मान राजपुत्रासी ।
अनुक्रमें सकळांसी । बैस बैसकार जाले ॥ ३६ ॥
राजा संतोषला मनीं । दोघे राजपुत्र देखोनि ।
अति उल्हासें करूनि । अगस्तीसीं बोलतु ॥ ३७ ॥
मुनि आश्चिर्य पाहे कोण । राजपुत्र हे सुलक्षण ।
पाहातां रूपाचें बरवेपण । रामासारिखे भासती ॥ ३८ ॥
अगस्ती बदे मिथिळनाथा । तूं बोलिलासी नव्हे अन्यथा ।
कोण भाग्य दशरथा । रायाचें हें कळेना ॥ ३९ ॥
मग तो वशिष्ठ बंधु खचितपात्रीं । दिव्याक्षरें चित्रविचित्रीं ।
लग्नपत्रिका ब्राह्मणमंत्री । रायाकरीं दिधली ॥ ४० ॥
पत्रिका घेऊन करीं । अत्यादरें मस्तकीं धरी ।
शुभ सन्मानें बहुपरी । पूजा तार्तम्यें जालें ॥ ४१ ॥
राजपुत्र सन्मानें । गौरविले बहुमानें ।
अनुक्रमें पूजामानें । रायें गौरव दिधलें ॥ ४२ ॥
बहु सन्मानें राजसुत । गजभारें मिरवत ।
अगस्तीऋषीसमवेत । आपुल्या मंडपा आले ॥ ४३ ॥
मग दोहीं मंडपीं देवदेवकें । चढचढें कौतुकें ।
पाहाया दाटलीं अनेकें । विमानें नभीं देवांचीं ॥ ४४ ॥
फुलेलें चंदन कुसरी[1] । दोहीं मंडपीं बरव्यापरी ।
अभ्यांगें जालीं मंगळतुरीं । ऋषी ब्राह्मण रायाचे ॥ ४५ ॥

---

१ " कस्तुरी " पाठांतर.

सकळ सिधीचा नायक । तो चि जेथें कुळदीपक ।
सकळ सांग अलोलिक । देवकप्रतिष्ठा जाली ॥ ४६ ॥
जाली देवकप्रतिष्ठा । वशिष्ठां आदि वरिष्ठां ।
राजगौरव जालें श्रेष्ठां । लखलखाट दाटलें ॥ ४७ ॥
ज्याचे ग्रामीं[1] चहुंकडे । चिंतामणी जिकडे तिकडे ।
रानोमाळे[2] परीस खडे । कोण पुसे तयांसीं ॥ ४८ ॥
जेथें वास रघोत्तमा । तें भाग्य निरोपमा ।
सुखसंपत्ति सांडिली सीमा । जिकडे तिकडे गजगज ॥४९॥
अपार कनकाचिया रासी । वाटिलिया त्या समयासी ।
मुक्तें रत्नें ब्राह्मणांसी । ऋंपी[3] विशेष दिधलिं[4] ॥ ५० ॥
अपार जालें तेव्हां दान । येथें बोलिलें सामान्य ।
पुढिल्या धाकाराचें मान । विरंग होईल ह्मणोनि ॥ ५१ ॥
दोहीं मंडपीं देवदेवकें । बैसलीं थोर कौतुकें ।
ब्राह्मणपूजा येथासुखें । गौरव धाकार जाले ॥ ५२ ॥
समस्त संतुष्ट धाकारें । सकळां पावलीं वस्त्रें चिरें ।
तव ते पाक जाले गजरें । समस्तीं स्नानें सारिलीं ॥ ५३ ॥
मंडपीं बैसल्या पंगती[5] । वशिष्ठादि पुण्यमूर्ति ।
सकळ ब्राह्मण भूपति । वर वऱ्हाडी मंत्री बैसले ॥ ५४ ॥
तव ते राजपुत्र विराज । बंधुसहित रघुराज ।
मध्यें मंडळी तेजपुंज । दिव्यासनीं शोभतसे ॥ ५५ ॥
रत्नदीपावळी अपारा । अलंकाराच्या फांकती तारा ।
मंगळराज नोवरा । परम शोभायमान ॥ ५६ ॥
पीतांबराच्या फांकती कीळा । तेजलहरीचा झळाळा ।
आणी मुक्तमणीच्या रंगमाळा । ढाळें तेज हेलावे ॥ ५७ ॥

---

१ " गांवीं " पाठांतर. २ " रानें माळें " पाठांतर. ३ " कुंसी " पाठांतर. ४ " दिधलें " पाठांतर. ५ " पांती " पाठांतर. ६ प्रभा. ७ प्रभा,

शृंगारमंडित सुखमूर्ति । मंडपीं शोभे सीतापति ।
ऋषी ब्राह्मण पंगती । योगी तापसी दाटले ॥ ५८ ॥
गोमुख आणी परमहंस । इति ब्रह्मच्यारी तापस ।
पुनश्चरणी पारण्यास । रामपंगती वैसले ॥ ५९ ॥
जितुक्या कांहीं पुण्यमूर्ति । तितुक्या बैसल्या रामपंगती ।
रायें राये नेणों किती । वरवऱ्हाडी बैसले ॥ ६० ॥
च्यारि वेद मुखोद्गत । सप्तस्वरीं विराजत ।
ब्राह्मणपंगती गर्जत । रायें पूजा आरंभिली ॥ ६१ ॥
पूजापात्रें घेऊन हातीं । रायासवें नेणों किती ।
गंधाक्षतें मिरवती । ब्राह्मणपूजा होतसे ॥ ६२ ॥
चहुं वेदींचे ब्राह्मण । अक्षरीं दक्ष विचक्षण ।
पूजा होतां स्वर वर्ण । नाना कळा दाविती ॥ ६३ ॥
सकळां ठेविलीं कनकताटें । रत्नवाट्या लखलखाटें ।
राजराण्या येक्या सेवटें । कौसल्यादि वाढिती ॥ ६४ ॥
अनेक शाखा वोदनां[1] । नाना परवडि पक्वान्ना ।
जिनस जिनसी परमान्ना । पंचामृत वाढिलें ॥ ६५ ॥
नाना रस नाना जिनसी । वाढिलें नाना सिखरिणीसी ।
ज्याच्या स्वादें पीयूपासी[2] । तृणतुछ केलें ॥ ६६ ॥
मग तो सकळ रसांचा सोलीव रस । सकळ रुचीचें राजस ।
तें उत्तम ताटीं विळास । रघुनाथजिकारणें ॥ ६७ ॥
सांग नैवेद्यें सुंदरा[3] । तैसीं च ताटें वधुवरां ।
पुढें पंगति अपारा । नाना रस वाढिले ॥ ६८ ॥
तों ते बोलती ब्रह्मवृंदें । राया येको विष्णु घ्या आनंदें ।
संकल्प सोडून ब्रह्मानंदें । पात्रीं बैसणें भूपति ॥ ६९ ॥
मग तो सूर्यवंशी दिनमणी । संकल्प सोडिला ते क्षणीं ।
आपोशनें केलीं ब्राह्मणीं । आपण पात्रीं बैसला ॥ ७० ॥

१ ओदन=भात. २ अमृतासी. ३ सुंदर. ४ नैवेद्य. ५ एको विष्णुर्महद्भूतम् इत्यादि संकल्प.

रामपंगतीविलास । उणें नाहीं परिकारांस[1] ।
तृप्तीरस सकळांस । माता कौसल्या वाढिती ॥ ७१ ॥
कृपालोचन तमाळनील । पंगती न्याहाळी भक्तवछळ ।
त्या जेवणाचे विलाहाळ[2] । अल्प अल्प सेवितसे ॥ ७२ ॥
पंकजनयन स्वानंदघन । सकळ पाहाती भक्तजन ।
तें संभ्रमाचें भोजन । सदां तृप्ताचें जालें ॥ ७३ ॥
मग त्या आच्मनाचे विलाळे[3] । रत्नपात्रीं सळाळ ।
जाले निर्मळाचें निर्मळें । समस्तीं आच्मनें सारिलीं ॥ ७४ ॥
सकळां तृप्तीभोजनें । शुध जालीं आच्मनें ।
मग समस्तां बहुमानें । मुखशुधि दिधल्या ॥ ७५ ॥
सभा घनवटली अचाट । वस्त्रां भूपणांचे लखलखाट ।
मध्य मंडळी वरवंट । राम बंधूसी विराजे ॥ ७६ ॥
उत्तम तांबोल परिकर[5] । कर्पूरमिश्रित सुंदर ।
राजआज्ञें अपार । रत्नें दक्षणे वाटली ॥ ७७ ॥
गंधें पुष्पें परिमळ धुशरें । ब्राह्मण पूजिले परिकारें ॥
सकळीं मंत्राक्षता गजरें । रामराजा वाढल्या ॥ ७८ ॥
राजपूजा बहुसाल । पुष्पें आणी फुलेलें[6] ।
रंग[7] सभारस लोलें । परिमळ धुशरें घमघमिती ॥ ७९ ॥
तों ते दीपवेळेचा गजर । आले दिवट्यांचे भार ।
दुभागीं उभे अपार । परम शोभा शोभली ॥ ८० ॥
तुरें लागली येक सेजे । दोहीं मंडपीं उछाह[8] गाजे ।
रंगवेळा[9] ते विराजे । नाच गायनें मांडलीं ॥ ८१ ॥
कोण उछाह समय । वाचे वर्णावा किती काय ।
देव पाहाती आश्चर्य । विमाना विमानें ठेलिती[10] ॥ ८२ ॥

---

१ परिकर किंवा, परिकार ह्मणजे प्रकार. २ विरहाळ=राव येईल अशी तक्रार. भोजनसमयीं होणाऱ्या आग्रहास उद्देशून हा शब्द येथें योजिला आहे कीं काय ? ३ वरील विलाहाळ आणि हा शब्द एक च दिसतो अर्थाचा बोध बरोबर होत नाहीं. ४ करोद्वर्तन. ५ " परिकार " पाठांतर. प्रकार. ६ अत्तर. ७ रस=रंग. ८ उल्हास. ९ आनंदवेळा. १० ठेलणें=गर्दी करणें, ढकलणें.

शृंगारमंडित सुखमूर्ति । मंडपीं शोभे सीतापति ।
ऋषी ब्राह्मण पंगती । योगी तापसी दाटले ॥ ५८ ॥
गोमुख आणी परमहंस । इति ब्रह्मच्यारी तापस ।
पुनश्चरणी पारण्यास । रामपंगती बैसले ॥ ५९ ॥
जितुक्या कांहीं पुण्यमूर्ति । तितुक्या बैसल्या रामपंगती ।
रायें राये नेणों किती । वरवऱ्हाडी बैसले ॥ ६० ॥
च्यारि वेद मुखोद्गत । सप्तस्वरीं विराजत ।
ब्राह्मणपंगती गर्जत । रायें पूजा आरंभिली ॥ ६१ ॥
पूजापात्रें घेऊन हातीं । रायासवें नेणों किती ।
गंधाक्षतें मिरवती । ब्राह्मणपूजा होतसे ॥ ६२ ॥
चहुं वेदीचे ब्राह्मण । अक्षरीं दक्ष विचक्षण ।
पूजा होतां स्वर वर्ण । नाना कळा दाविती ॥ ६३ ॥
सकळां ठेविलीं कनकताटें । रत्नवाट्या लखलखाटें ।
राजराण्या येक्या सेवटें । कौसल्यादि वाढिती ॥ ६४ ॥
अनेक शाखा वोदनां । नाना परवडि पक्वान्ना ।
जिनस जिनसी परमान्ना । पंचामृत वाढिलें ॥ ६५ ॥
नाना रस नाना जिनसी । वाढिलें नाना सिखरिणीसी ।
ज्याच्या स्वादें पीयूपासी । तृणतुछ केलें ॥ ६६ ॥
मग तो सकळ रसांचा सोलीव रस । सकळ रुचीचें राजस ।
तें उत्तम ताटीं विळास । रघुनाथजिकारणें ॥ ६७ ॥
सांग नैवेद्यें सुंदरा । तैसीं च ताटें वधुवरां ।
पुढें पंगति अपारा । नाना रस वाढिले ॥ ६८ ॥
तों ते बोलती ब्रह्मवृंदें । राया येको विष्णु घ्या आनंदें ।
संकल्प सोडून ब्रह्मानंदें । पात्रीं बैसणें भूपति ॥ ६९ ॥
मग तो सूर्यवंशी दिनमणी । संकल्प सोडिला तें क्षणीं ।
आपोशनें केलीं ब्राह्मणीं । आपण पात्रीं बैसला ॥ ७० ॥

१ ओदन=भात. २ अमृतासी. ३ सुंदर. ४ नैवेद्य. ५ एको विष्णुर्महद्भूतम् ादि संकल्प.

राया आनंद गहन । उमा महेश शोभायमान ।
नाना उपचारी पुजून । गौरीहरा वैसविलें ॥ ९५ ॥
ते मुक्तमणीचा मखरीं । मुक्तचांदोवे त्यावरी ।
रत्नघोस वहुपरी । हेमकळस चहुंकोनी ॥ ९६ ॥
कनकसुतें ते मंडित । रत्नदीप विराजत ।
पुष्पें मंडप घमघमित । छेत्रें पताका त्यावरी ॥ ९७ ॥
विर्जणें चामरें उपचार । रम्य साजिरें सुंदर ।
आलोलिक गौरीहर । राम पाहों वैसली ॥ ९८ ॥
राया थोर लगवग । रामा मूळ जातां प्रसंग ।
पूजा सामग्री येथासांग । उत्तम वस्तु घेतल्या ॥ ९९ ॥
सव शतानंद ह्मणे राया । घटिका चाले लवलाह्या ।
जानकीवर आणावया । सीघ्र गेलें पाहिजे ॥ १०० ॥
राया मनीं आवडतें । तें चि वोलिलें पुरोहितें ।
राजा वोले ब्राह्मणातें । समस्त तुह्मी चलावें ॥ १ ॥
रमा[1] अवतार ज्याचा घरीं । वैभवा संख्या कोण करी ।
सकळ सिध सामग्री । राजा वैभवें चालिला ॥ २ ॥
लग्न घटिकेची तांतडी । राम पूजेची आवडी ।
रुखवताची पॅरवडी । काये ह्मणोनि वर्णावी ॥ ३ ॥
पुढें निशाणें कर्णे भेरी । कडक गाजे वाजांतरी ।
संख्येविण वहुपरी । अनेक वाद्यें वाजती ॥ ४ ॥
पुढें गजाचे गजभार । श्रृंगारमंडित अपार ।
वीर वैसले थोर । वाजीमंडित वऱ्हाडी ॥ ५ ॥
जांबुनेदाचा वोतला । चित्रविचित्र ठसाविला ।
रत्नमंडित निघाला । रथ रघुनाथजिकारणें ॥ ६ ॥
छेत्रें पताका लखलाखित । मेघडंब्रे तगतगित ।
मुक्तचांदोवे झमकत । घोसमणी रत्नाचे ॥ ७ ॥

१ पंसे. २ सत्वर. ३ " राम " पाठांतर. ४ उपचार किंवा प्रकार. ५ सुवर्णाचा.

राया दशरथाचा महिमा । भाग्यें सांडिलीसे सीमा ।
जे ते परि राजे रमा । उपमेवेगळें वैभव ॥ ८३ ॥
राजआज्ञा सेवकासी । अमोल्य वस्त्रें भूषणें रासी ।
करूनि दिधल्या कळावंतासी । परम संतुष्ट केलें ॥ ८४ ॥
मग तो विसर्जिला समये । राजआज्ञें राये राये ।
ज्यां ज्यां जानवसें ठाये । ते ते विश्रांती गेले ॥ ८५ ॥
बहुत क्रमिलीसे निसी । समस्त निद्रा विश्रांतीसी ।
ब्राह्म मुहूर्तीं जिनसजिनसी । वाद्यें वाजों लागलीं ॥ ८६ ॥
ते प्रातःकाळाचीं मंजुळें । तुरें लागली निवळें ।
दोहीं मंडपीं त्या काळें । जिकडे तिकडे आनंद ॥ ८७ ॥
दोहीं मंडपीं संभ्रमानें । केशरकस्तुरीचीं मार्जनें ।
मुक्ताफळें विराजमानें । वरि रांगोळ्या चित्रिल्या ॥ ८८ ॥
राये राय मुख्य राज । स्नान दानाची गजगज ।
ज्याच्या स्वधर्माचा ध्वज । शुध क्रियें विराजे ॥ ८९ ॥
प्रातःकाळाचा प्रसंग । थोर दाटलासे रंग ।
समारंभें अभ्यंग । जनकमंदिरीं द्विजांचें ॥ ९० ॥
जालीं समस्तांचीं स्नानें । गंध पूजा बहुमानें ।
तव नभीं अरुणानें । किंचित प्रकाश केला ॥ ९१ ॥
जनकगृहीं लगबग । घटिका घालितां प्रसंग ।
जोतिसिया लागवेग । मंदिरमस्तकीं वेघेला ॥ ९२ ॥
मंगळाष्टकें आंत बाहेरी । सूर्यउदयाचा आवसरीं ।
ब्राह्मणमंत्राचा गजरीं । घटिका घातली संभ्रमें ॥ ९३ ॥
तव प्रातःकाळीं मनोहरें । कैलासीचीं वधुवरें ।
सिणगारून गौरीहरें । नंदीआरूढ आलीं ॥ ९४ ॥

---

१ रात्र. २ जिनसजिनसी याचा अर्थ नाना प्रकारचीं असा दिसतो. ३ "दर्व्हां" पाठांतर ४ संमार्जनें, सडे. ५ चढला. ६ शृंगारून. ७ शंकरपार्वती.

राया आनंद गहन । उमा महेश शोभायमान ।
नाना उपचारी पुजून । गौरीहरा बैसविलें ॥ ९५ ॥
ते मुक्तमणीचा मखरीं । मुक्तचांदोवे त्यावरी ।
रत्नघोस बहुपरी । हेमकळस चहुंकोनी ॥ ९६ ॥
कनकसुतें ते मंडित । रत्नदीप विराजत ।
पुष्पें मंडप घमघमित । छेत्रें पताका त्यावरी ॥ ९७ ॥
विर्जणें चामरें उपचार । रम्य साजिरें सुंदर ।
आलोलिक गौरीहर । राम पाहों बैसली ॥ ९८ ॥
राया थोर लगबग । रामा मूळ जातां प्रसंग ।
पूजा सामग्री येथासांग । उत्तम वस्तु घेतल्या ॥ ९९ ॥
तव शतानंद ह्मणे राया । घटिका चाले लवलाह्या ।
जानकीवर आणावया । सीघ्र गेलें पाहिजे ॥ १०० ॥
राया मनीं आवडतें । तें चि बोलिलें पुरोहितें ।
राजा बोले ब्राह्मणातें । समस्त तुह्मी चलावें ॥ १ ॥
रमा अवतार ज्याचा घरीं । वैभवा संख्या कोण करी ।
सकळ सिध सामग्री । राजा वैभवें चालिला ॥ २ ॥
लग्न घटिकेंची तांतडी । राम पूजेची आवडी ।
रुखवताची पैरवडी । काये ह्मणोनि वर्णावी ॥ ३ ॥
पुढें निशाणें कर्णे भेरी । कडक गाजे वाजांतरी ।
संख्येविण बहुपरी । अनेक वाद्यें वाजती ॥ ४ ॥
पुढें गजाचे गजभार । श्रृंगारमंडित अपार ।
वीर बैसले थोर । वाजीमंडित वऱ्हाडी ॥ ५ ॥
जांबुनंदाचा वोतला । चित्रविचित्र ठसाविला ।
रत्नमंडित निघाला । रथ रघुनाथजिकारणें ॥ ६ ॥
छेत्रें पताका लखलखित । मेघडंब्रे तगतगित ।
मुक्तचांदोवे झमकत । घोसमणी रत्नाचे ॥ ७ ॥

१ पंखे. २ सत्वर. ३ " राम " पाठांतर. ४ उपचार किंवा प्रकार. ५ सुवर्णाचा.

अमित निघालीं पाले छेत्रें । रथावरी नाना विचित्रें ।
कनकदंडें पवित्रें । च्यामरें वरि वारिती ॥ ८ ॥
त्रैलोकीचे नवाजी । अणसुटें निर्मळ च्यारि वाजी ।
स्वेतवर्णी तेजःपुंजी । तया रथासी शोभले ॥ ९ ॥
च्यारि वाजी ते सुंदर । वरि कनकमणी आळंकार ।
पुर्टी मुक्तांचे झल्लर । झबके मणी माणिकें ॥ ११० ॥
तळ लागेना भूमीस । नखें टेकिलीं धरेस ।
सदां उदित गमनास । सभ्य सखोल बुधीचे ॥ ११ ॥
त्यासी उच्चैःश्रव उपमणें । तरि तो मंद कोटीगुणें ।
कां जे तीस घड्याचें पेणें । मनापुढें गति यांची ॥ १२ ॥
ऐसे ते वारूमंडित । कनकरथ विराजत ।
दिव्यासनें तया आंत । राजस रामाकारणें ॥ १३ ॥
पुढें चालिला तो रथ । तया पाठीसी रूखवत ।
तेलवण मिरवत । रघुनाथजिकारणें ॥ १४ ॥
सेवलाडु साखरलाडु । द्राक्षलाडु गुंजलाडु ।
सारिकलाडु खोबरेंलाडु । खसखसेचे बांधले ॥ १५ ॥
येक च्यारोळ्याचे सुंदर । लार्यांचे लाडु परिकार ।
गोडंब्याचे अपार । जिनसवार चालिले ॥ १६ ॥
फुग्या फेण्याचे परिकार । शुध्य कडकणे जिनसवार ।
नाना परीचे सुंदर । चित्र विचित्र चालिले ॥ १७ ॥
उत्तम वसनें आभंरणें । चालिलीं रघुनाथजिकारणें ।
तें वर्णावें कोण्या गुणें । अभिनव पूजा चालिली ॥ १८ ॥

---

१ नामांकित. २ अनसूट, अनुच्छिष्ट, न वापरलेले, नवीन. ३ इंद्राचा घोडा. ४ पेणा=मुक्काम. ५ बुंदीचे लाडु की काय ? ६ लाह्यांचे. ७ "रघुनाथजिकारणें।" असा चरणपाठ. ८ पुरीसारखा पातळ पण कडक पदार्थ फराळांत असतो तो. ९ " तिळवे निघाले अपार । फुग्या फेण्याचे परिकार । शुध कडकणे जिनसवार । चित्रविचित्र चालिलें ॥ " पाठांतर. तिळवा=तिळाचा लाडु. १० अलंकार.

रामपूजेची सामग्री । छेत्रें ओंहाटलीं तयावरी ।
रुखवत परोपरी । जनकरायें चालविलें ॥ १९ ॥
कनकतार्टे अपारा । अक्षता होतवे सुंदरा ।
आरातिया रघुवीरा । वधुसिविका चालिल्या ॥ १२० ॥
तया मागें सिविका । वऱ्हाडणी मंगळिका ।
समस्त मुख्य नायेका । राजवल्लभा चालिल्या ॥ २१ ॥
तया पाठीसी सिविका । ऋषीब्राह्मणांच्या अनेका ।
सूर्यापानें पताका । छेत्रपति चालिले ॥ २२ ॥
कनकमणी रथ बरवे । खचित मुक्तांचे चांदोवे ।
वऱ्हाडि राजे थवे थवे । राया वेष्टित चालिले ॥ २३ ॥
रुखवत चालिलें विराजमान । कौसल्यानंदनालागून ।
पाहाती आश्चिर्य करून । सुरवर जन नर नारी ॥ २४ ॥
छेत्रें ओंहाटलीं बहुतें । तुरें वाजती अमितें ।
रामा मूळ लग्नातें । जनक संभ्रमें आला ॥ २५ ॥
पुढिलिये समासीं भेणु जाती । मैथिळी फळ वाईल भूपति ।
वेणी ह्मणे सोहळा श्रोतीं । सादर श्रवण करावा ॥ १२६ ॥
इति श्रीरामायणे । आदिकांडे सीतासैवर नाम । समास आठवा ॥ ८ ॥

---

## ॥ समास नववा ॥ ९ ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

रामा मूळ जातां लग्नासी । जनकराज संभ्रमेंसी ।
तेलवण रुखवतेंसी । वरमंडपा आले ॥ १ ॥
अयोध्याधीश तो सन्मानें । जनकराया बहुमानें ।
बैसकार दिव्यासनें । अनुक्रमें सकळांसी ॥ २ ॥

---

१ वाजविली किंवा सिद्ध केली. २ ताटलीत कणकेचे दिवे लावतात ते. ३ परणणें किंवा भणणें ह्मणजे लग्न लावणे. ४ फलप्रदान करितील.

वशिष्ठादि ऋपेश्वर । शतानंदादि मुनिवर ।
बहु वेदींचे अपार । ब्राह्मण सभे बैसले ॥ ३ ॥
बहु मानाचीं बोलणीं । बहु प्रीतीची करणी ।
जनकवधु वऱ्हाडिणी । कौसल्या मानें बैसल्या ॥ ४ ॥
दोही दळींची दाटणी । सभा घनवटली ते क्षणीं ।
देव वऱ्हाडी आंगणीं । अंतरें विमानें दाटलीं ॥ ५ ॥
ब्राह्मणमंत्राचे उच्चार । जनकराज उपचार ।
रामपूजा सुंदर । करिता जाला ते काळीं ॥ ६ ॥
भुवनसुंदर तो रघुनंदन । राजा पाहे स्वानंदघन ।
ह्मणे याचे पूजेलागून । जें तें थोडें वाटतें ॥ ७ ॥
आपुले आवडीचे आळंकार । रामालागी उपचार ।
पुढें ठेऊन सुंदर । राम पूजिता जाला ॥ ८ ॥
मस्तकीं लपेटिलें तगट[1] । जांबुनदाचा रसंपट ।
रत्नकिळाचे सेवट । गोल पदर झमकती ॥ ९ ॥
जांबुनदाचे तार । मुक्तें वोविलीं जिनसवार ।
तेजोरासी सुंदर । झुवके मस्तकीं शोभले ॥ १० ॥
सहज सुंदर ते नीळ तन । कनक पाँग[2] विराजमान ।
सुंदरमुख पंकजनयन । रत्नकुंडलें शोभलीं ॥ ११ ॥
पीतपट तेजोरासी । रायें उकलिला सभेसी ।
मग तो दुर्वादळ तनूसी । परम शोभता जाला ॥ १२ ॥
नाना मणीमंडित । मेखळा ते धगधगित ।
क्षुद्र घंटिका विराजत । कटप्रदेशीं मिरवती ॥ १३ ॥
वीरकंकणें सुंदरशामा । रायें वाइलीं रघोत्तमा ।
लखलखाटें सांडिली सीमा । मुद्रिका पोवची धगधगिती ॥१४॥
सकळ तेजाचा सारांश । राजवस्त्रांचे विळास ।
दुर्वादळ तनु राजस । सुंदरपणें विराजे ॥ १५ ॥

---

१ तकट=पट. २ जरतारी वस्त्र. ३ शेला.

राजपूजा वरवंट । कटमदेसीं कदर्पट ।
रत्नकीळांचे लखलखाट । मुक्तपदर झमकती ॥ १६ ॥
दिव्यपट तो विराजत । स्कंधभागीं झळकत ।
कीळा फांकती अमित । मुक्तें पदरीं झमकती ॥ १७ ॥
रामपूजेचा सोहळा । थोर फावला मिथिळा ।
मन नयनसुखसुकाळा । वरपडी जाली सकळांसी ॥ १८ ॥
पवित्र पाउलें रामाचीं । तेथें दृष्टी जनकाची ।
अंदु वाकी नेपुराची । पदीं पूजा वाइली ॥ १९ ॥
नाना रत्नें फांकती कीळा । ते पदकंकंठमाळा ।
तेजोरासी मुक्तमाळा । आपादपर्यंत घातल्या ॥ २० ॥
त्यावरी साजे वैजयंती । आपादपर्यंत मिरवती ।
भुवनसुंदर जगत्पति । राम शोभे संभ्रमें ॥ २१ ॥
भाळीं टिळक रसाळ । केशर रेखिलें निर्मळ ।
सुंदर अक्षता वर्तुळ । वरवेषणें शोभल्या ॥ २२ ॥
सुगंध कुसरी लाऊन । परिमळ धुशरीं पुजून ।
आपादपर्यंत सुमन- । माळा रायें घातल्या ॥ २३ ॥
कोण ूजेची नवाई । जनकें पूजिले जावाई ।
देवरूपी ते समई । तटस्त सभा पाहातसे ॥ २४ ॥
सकळ संपतीची थोराई । दक्षणा समेर्पिली ते समई ।
जनकराजें जावाई । येथासांग पूजिले ॥ २५ ॥
रामपूजन जावाइत्वें । आराधिलें पूर्वी होतें ।
जनकें पूजिलें राघवातें । केवि मज तें बोलवें ॥ २६ ॥
कनक तगटें रसाळ पानें । सकळ सांग बहुमानें ।
वरदकरीं जनकानें । तांबोल तेव्हां दिधला ॥ २७ ॥

---

१ कटीवस्त्र. २ " बैसली " पाठांतर. ३ मिठी, मुरकुंडी. ४ " संकल्पिली " पाठांतर. ५ तबक (?)

पानवेली बाग वनें । आगराची जें जें स्थानें ।
रामापुढें जनकानें । संकल्पिलीं समस्त ॥ २८ ॥
मग तें मंगळरूप पाउलें । जेथें संत विसावले ।
ते सुमेधेनें उठिले । अति संभ्रमें राजस ॥ २९ ॥
जानकीसैवराच्या लोभा । मातृका वऱ्हाडिणींचा गल्बा ।
त्यांत अर्ध मात्रा वालंभा । कुरवंडी रामासीं ॥ ३० ॥
निज तृप्तीते पोखैती । रामा वोवाळी अभेदभक्ति ।
पुढें शुध्य क्रीया होती । तिच्या तोलें या आल्या ॥ ३१ ॥
राया जनकाच्या वऱ्हाडिणी । रामा केली अक्षवाणीं ।
ठकौर मूर्ति च्यापपाणी । सुखस्वानंदें पाहाती ॥ ३२ ॥
तव वशिष्ठ बोले सुलक्षणा । अनंतगुणपरिपूर्णा ।
हात लावीं तेलवणा । भुवनसुंदरा ये समई ॥ ३३ ॥
मग तो वरदपाणी सकुमार । मुद्रिकामंडित मनोहर ।
भुवनसुंदर कराग्र । तेलवणा स्पर्शला ॥ ३४ ॥
मग कौसल्या आदि वनिता । राया दशरथाच्या कांता ।
पुजूनिया रुखवता । सुमेधेनें दिधले ॥ ३५ ॥
वस्त्रं आळंकार गंधमाळा । परिमळ धुशरें तांबोला ।
ब्राह्मण पूजिले सकळा । अपार द्रव्य वाटिलें ॥ ३६ ॥
सकळां जाली पूजा दानें । मिथिळनाथें सन्मानें ।
राजपूजा बहुमानें । वरवऱ्हाडी पूजिले ॥ ३७ ॥
पूजागौरव परस्परें । बोलती मानाचीं उत्तरें ।
सकळा सांग सकळ प्रकारें । मग संभ्रमें चालिले ॥ ३८ ॥
तळीं उतरलीं देवयानें । त्यांचीं उचललीं विमानें ।
राम मणु संभ्रेमानें । दुंदुभी तुरें लागलीं ॥ ३९ ॥
दोहीं दळीचीं मंगळतुरें । निशाणें भेरि अपारें ।
कडक उठिला वाजांतरें । गजयानें तयाचीं ॥ ४० ॥

१ प्रिय. २ पोपती, पोषण करिती. ३ मनोहर.

कीर्ति पवाड वर्णित । गुणानुवाद ते अमित ।
वेद भाट मूर्तिमंत । नाना भाषा गर्जती ॥ ४१ ॥
गज वऱ्हाडी चवरडोला । दिव्य निशाणें दिव्य ढाला ।
वाजी वऱ्हाडी बहुसाला । छेत्रें पताका झमकती ॥ ४२ ॥
असंख्य दाटले ते भार । कनकमंडित रत्नाकर ।
रामरथ सुंदर । क्षिप्र पाहों ठाकलें ॥ ४३ ॥
मिथिळआवडीचा वोतला । केवळ आनंदाचा वळला ।
अति संनिध आणिला । जनकजावाई वैसले ॥ ४४ ॥
छेत्रें पताका मेघडंवरें । माहि मछपुछें अपारें ।
सूर्यापानें पालछेत्रें । कनकमणीचीं ते रथीं ॥ ४५ ॥
शोभे जानकीजीवन । सुमंत सारथी विराजमान ।
शेष भरथ शत्रुघ्न । समीप वंधु शोभले ॥ ४६ ॥
सनक सनंदन सनत्कुमार । वेश धरून सुंदर ।
विडिया सेवा परिकार । जगजीवना जाणविती ॥ ४७ ॥
पीकपात्री तो देवेंद्र । छत्र धरून मृगेंद्र ।
अष्टदिशाचे दिगेंद्र । चामरे रथा ढाळिती ॥ ४८ ॥
वशिष्ठादि ऋषेश्वर । आणी ब्राह्मण अपार ।
सिविका निघाल्या सुंदर । छेत्रेंपताकामंडित ॥ ४९ ॥
वऱ्हाडिणी मंगळमंडिता । हातिचे आणी अक्षता ।
रत्नताटें अमिता । सिविका भार चालिले ॥ ५० ॥
अष्ट माहासिधीचा ताटीं । जांबुनदभांगाराची दाटी ।
कस पाहातां तरि कोटी । वैकुंठ टाकसाळेचें ॥ ५१ ॥
ते वैकुंठीचे भांगार । उंच उंच आळंकार ।
जानकी लक्ष्मी साचोकार । तिजकारणें चालिले ॥ ५२ ॥
दिव्य वस्त्रें कोटी च कोटी । चालिल्या जिनस जिनस साटी ।
देवांगवसनें गोमटीं । जनकजेकारणें ॥ ५३ ॥

---

१ जांबूनद=भांगार=सुवर्ण. २ खरोखर.

द्रव्यशक्तीसी कुबेर । कनक चालिलें अपार ।
पुतळ्या मोहरा जिनसवार । द्याकारा धन चालिलें ॥५४॥
नवरत्नाचे संदूक । पेट्या मांदुसा अनेक ।
परिसनार्णी आलोलिक । संख्येवेगळी चालिलीं ॥ ५५ ॥
राया दशरथाचें फळ । रामप्राप्ती केवळ ।
जानकीकारणें निर्मळ । संभ्रमेंसीं चालविलें ॥ ५६ ॥
ज्या फळा सेविती योगी । ज्याला तापसी वीतरागी ।
शोधिताती युगानयुगीं । ते जनकजे चालिलें ॥ ५७ ॥
ज्या कारणें जाले साधक । ज्याकारणें जाले नेमक ।
ज्याकारणें आवस्यक । सर्व सांडिलें जेंहिं ॥ ५८ ॥
तें फळ जानकीकारणें । चालिलेंसें पूर्णपणें ।
तुछें जालीं वरवेपणें । सर्व फळें चि ज्यापुढें ॥ ५९ ॥
छेत्रें पताका अमित । मुक्तचांदोवे झळकत ।
समारंभें विराजत । फळ जानकी चालिलें ॥ ६० ॥
तया पाठीसीं अयोध्यापति । रथ छत्रासी नाहीं मीति[3] ।
ध्वज पताका झळकती । राजभार चालिला ॥ ६१ ॥
ते समईची दाटणी । छेत्रें छेत्रांची खेटणी ।
किती येक ते वेत्रपाणी । मध्यभागीं फिरती ॥ ६२ ॥
पुष्पवृष्टीचा सडा । परिमळ धुशराचा धुळवडा ।
आगाज होती धडाडा । दमामे भेरी वाजती ॥ ६३ ॥
दोही दळींचे येक भार । रथ चालिले अपार ।
शृंगारमंडित माहा वीर । केशर कस्तुरी डवरले ॥ ६४ ॥
लाहान थोर सकळ जन । समस्त हि विराजमान ।
कोण्ही नाहीं तेथें दीन । सर्व वऱ्हाडी चालिले ॥ ६५ ॥

---

१ संदूक; पेट्या. २ " चालविलीं " पाठांतर. ३ याडांत पाठ " निती " आहे. मागील ३×५४ पहा. ४ आवाज असा अर्थ स्पष्ट आहे. मागील ६×७६ पहा. ५: डवरणें=भरून जाणें.

ते कनकमणीची मिथिळापुरी । शृंगारिलिसे बहुपरी ।
राम पाहाया नर नारी । मंदिरमस्तकीं दुभागीं ॥ ६६ ॥
कोण जनकाचें वैभव । आणी ते भक्तीचा थोराव ।
राममांसीचें[1] गौरव । जे ते परि विराजे ॥ ६७ ॥
कनकभूमी जिकडे तिकडे । कुंकुमकेशराचे सडे ।
मुक्तरंगमाळा कोडें[2] । रामरथा घातल्या ॥ ६८ ॥
रथ जातसे त्यावरून । थीर थीर शोभायमान ।
थोके[3] तों किन्नरगायन । अष्ट नायका नाचती ॥ ६९ ॥
मिथिल पुढें वेत्रधारी । राम मिरवे उभय गजरीं ।
ते समई जयजयकारीं । विश्व आनंदें पाहातसे ॥ ७० ॥
देवीं दाटलें नभमंडळ । विमानीं यानीं सकळ ।
बोलती हे उछाहवेळ । न भूतो न भविष्यति ॥ ७१ ॥
सुंदरमूर्ति शोभायमान । दिव्य रथीं रघुनंदन ।
ते समई सुमन-। वृष्टि होय देवांची ॥ ७२ ॥
ते समईची दाटणी । किती वारिती वेत्रपाणी ।
रथ रथा खणाखणी । राम पाहाया पेलिती[4] ॥ ७३ ॥
झल्लरें मुक्ताफळांची । गुंतती येक येकाचीं ।
दृष्टी पुढें सकळांची । राम पाहायाकारणें ॥ ७४ ॥
तेव्हां जगझापें मेघडंबरें । हिंदोळती येकसरें ।
जेंहिं धरिलीं होतीं करें । ते चि पाहाती रामासी ॥७५॥
पताकांची दाटणी । सूर्यापानांची खेटणी ।
माहिमुखा खणाखणी । राम पाहातां होतसे ॥ ७६ ॥
रथवाजी कौतुकें । भूमी टेकिती चालतां नखें ।
वरुत्या माना हरिखें[5] । राम पाहाती ते काळीं ॥ ७७ ॥
थोर सुखाचा पर्वकाळ । कोण आनंदाची वेळ ।
विश्रांति विसावा मंगळ । राम पाहाती मिरवतां ॥ ७८ ॥

---

१ "रामी प्रीतीचें" पाठांतर. २ कौतुकानें. ३ "थोकता" पाठांतर
४ पेलणें=लोटणें. ५ आनंदानें.

पुढिल्या भाराची मागें सुखें । राम पाहाती येथासुखें ।
पशु गज वाजी हरिखें । राम पाहाती फिरोनि ॥ ७९ ॥
मंगळ तुरांचा गजर । नाच गायनें अपार ।
मदनमूर्ति सीतावर । विश्व पाहे आनंदें ॥ ८० ॥
येका वाटे हा आत्मा । येका भावे परमात्मा ।
येका वाटे अंतरात्मा । ध्येयमूर्ति सकळांची ॥ ८१ ॥
यका वाटे हा जीवन । येका वाटे स्वानंदघन ।
सकळां तृप्ती विराजमान । रामरूपा पाहातां ॥ ८२ ॥
राया जनकाचा उल्हास । झेंपावेना या मनास ।
वाचा होये कासावीस । न ये वर्णितां ह्मणोनी ॥ ८३ ॥
वाचे नव्हे तो उचार । राम मिरवणेचा गजर ।
थोर संभ्रमें उपचार । जनकमंडपा आणिले ॥ ८४ ॥
राजद्वाराचे पूर्व दिशे । रामरथ थोकला असे ।
सकळ वऱ्हाड समरसे । तुरें गजरें वाजती ॥ ८५ ॥
तोरणमंडित माहाद्वार । सत्य रमेचें मंदिर ।
गजगज आंत बाहेर । येती जाती दाटणी ॥ ८६ ॥
तों पूर्व द्वारें अमिता । सुवासिनी मंगळमंडिता ।
आरतिया लखलखिता । लक्षानलक्ष आल्या ॥ ८७ ॥
परमानंदें राजांगना । कुरवंडी शोभायमाना ।
पंचप्राणीं रघुनंदना । वोवाळून चालिली ॥ ८८ ॥
सुंदर साजिरिया मुखकमळा । आरत्या करूनियां सकळा ।
राम उतरतां सोहळा । पायघडिया घालिती ॥ ८९ ॥
देटेंविण सुमन सेले[1] । पायघडिया घातले ।
सकुमार रामपाउलें । विराजती त्यावरी ॥ ९० ॥
सुंदर चाले सीतापति । परिधानें तें झळकती ।
किती येक सांवरिती । भक्तराज ते काळीं ॥ ९१ ॥

---

१ कपडे.

वरि मुक्तांचे चांदोवे । घोस रत्नांचे हेलावे ।
नाना उपचाराचे उठावे । रघुनाथजिकारणें ॥ ९२ ॥
पूर्ण जळकुंभ शिरीं । दिव्यांगना बहुपरी ।
पुढें आल्या सव्य हारी । शकुनरूप शकुनासी ॥ ९३ ॥
कनकदंडें चामरें । दुभागीं ढळती अपारें ।
जनकें जावाई उपचारें । सभामंडपा आणिले ॥ ९४ ॥
तो मुक्तमंडप विराजमान । सकळ सुंदर्याचें सदन ।
तो दिव्यासनीं रघुनंदन । बंधुसहित विराजे ॥ ९५ ॥
वशिष्ठादि ऋषेश्वर । ब्राह्मण बैसले अपार ।
राये राये तार्तिम्य थोर । बैस बैसकार जाले ॥ ९६ ॥
राया जनकाची अंगना । कौशल्यादि राजांगना ।
देऊनिया सन्माना । वरासनीं शोभल्या ॥ ९७ ॥
सभा घनवटली अपार । राया दशरथाचे भार ।
गोत संपत्ति नाहीं पार । मतापदिनमणी विराजे ॥ ९८ ॥
आणी पुत्रांची संपत्ति । त्यांत विशेष राममूर्ति ।
सून मिळाली रत्नदीप्ति । पूजूं इछी उल्हासें ॥ ९९ ॥
[1]आंत बाहेरी दाटलें फळ । रामाकरितां अवघें सफळ ।
जिकडे तिकडे उछाह वेळ । सभामंडपीं गाजते ॥ १०० ॥
राम पुत्रत्वें ज्याच्या घरीं । भाग्यास संख्या कोण करी ।
अष्ट माहासिधी [2]कामारी । मुख्य रमा रावती ॥ १ ॥
ऐसा राजा दशरथ । सकळ सांग पदार्थ ।
सून पूजावी मनोरथ । लालसचित्तें बोलतु ॥ २ ॥
वशिष्ठ राजा ये काळीं । सीघ्र आणावी राजबाळी ।
पूजा करूनि मैथळी । फळ समर्पूं मुनिवरा ॥ ३ ॥

---

१ "आत बाहेर दाटले फळ । रत्नआळंकाराचा कोळ । फाके तेणे रविमंडळ । मळिण दिसों लागलें ॥" असा पाठ बाडात आहे. २ कामारें=सेवक.

वशिष्ठ बोले ते अवसरीं । राया आणावी राजकुमरी ।[१]
तव ते संभ्रमें सुंदरी । सभेमध्यें चामके ॥ ४ ॥
सखिया सांगातिणी सवें । सभ्य प्रधानाचे थवे ।
वरि मोत्यांचे चांदोवे । देव्हडीं[२] चामरें ढळताती ॥ ५ ॥
पंकजनयनीं सुलक्षण । कोण रूपाचें वरवेंपण ।
जांबुनंद जें सुवर्ण । त्याचीं नेणों वोतली ॥ ६ ॥
हे हि कठिण उपमा । जानकीरूप निरोपमा ।
भूषणमंडित मनोरमा । सभेमध्यें आली ॥ ७ ॥
उतमासनीं राजपुत्रि । चामरें उडती दाटी छेत्रीं ।
मंगळवाद्यें ब्राह्मणमंत्रीं । राजा पूजे बैसला ॥ ८ ॥
राजा बोले वशिष्ठांसी । रामापाडें हे गुणरासी ।
ईची पूजा विळासीं । करूं वांछी मन माझें ॥ ९ ॥
हो जि ह्मणे उपाध्याई । ऋषी ब्राह्मण सकळ हि ।
गर्गाच्यार्या ते समई । जोतिसी पुढें जाला ॥ ११० ॥
कनकमणीचे ते[४] कळस । शृंगारिले राजस ।
जोतिसी बोले वशिष्ठास । देतां घेतां समयो हा ॥ ११ ॥
कलशपूजा गणेशपूजा । येथें मान आहे माझा ।
लग्न लागलिया वोजा । च्यारि दिवस तुमचे ॥ १२ ॥
वशिष्ठ ह्मणे हो जि बरें । मानदक्षणा घ्या आदरें ।
वधु पूजून उपचारें । मग हो द्या जोतिसी हो ॥ १३ ॥
तवं शतानंद मुनिवर । रायासी बोलिला उत्तर ।
जोतिसी समजावा सत्वर । घटिका चाले सोळावी ॥१४॥
जोतिसी बोले रायासी । हें कळत आहे तुह्मासी ।
येथेंच दक्षणा आह्मासी । संतुष्ट केलें पाहिजे ॥ १५ ॥
राजा बोले मुनिवर्या । गर्गाच्यार्या ज्योतिसिया ।
स्वइछा माग या समया । इछित जें मन तुझें ॥ १६ ॥

---

१ "रायें आणविली राजकुमरी ।" असा चरण वाढात आहे. २ "देवढी" पाठांतर. ३ रामाला योग्य. ४ "तेणे" पाठांतर.

अनंतकोटिब्रह्मांडनाथें । या रघुनाथजि समर्थें ।
विधिभूगोळीचें आह्मांतें । जोतिसमिरासी दिधलें ॥ १७ ॥
यामध्यें दानशूर । असंख्य आहेत माहावीर ।
परि सूर्यवंशी नामधार । मुगुटमणी सर्वांचे ॥ १८ ॥
तुझे घरींचें शोबन । वांछित होतें आमुचें मन ।
तूं दाता विराजमान । आमुची वांछा ते किती ॥ १९ ॥
ज्याचे गावीं परिस खडे । चिंतामणी जिकडे तिकडे ।
कल्पतरुचें झाडोरे । रानोमाळ लागले ॥ १२० ॥
ऐसा राजा दशरथ । सर्व गुणें तो समर्थ ।
नाना रत्नें पदार्थ । जोतिसिया दक्षणा दिधली ॥ २१ ॥
दिधलीं धनाचीं भांडारें । अमोल्यें वस्त्रें अपारें ।
आणी नाना आळंकारें । जोतिसी येथेष्ट तोपला ॥ २२ ॥
फळसपूजा गणेशपूजा । येथासांग करुनि राजा ।
उपाध्याच्या गजगजा । मान दक्षणा पावल्या ॥ २३ ॥
समस्त तोष पावोन । बोलती राया वधुपूजन ।
आतां करावें फळमदान । अति समयो शुभ हा ॥ २४ ॥
पुढें जनकाची नंदनि । राजा सन्मुख बैसोनि ।
पूजा मंगळविधानी । ब्राह्मणमंत्रीं होतसे ॥ २५ ॥
मुक्तमंडित पीतांबर । मुक्तकंचुकी परिकार ।
रायें समर्पिला सुंदर । जनकजेते शोभला ॥ २६ ॥
कनकगर्भाची धगधगित । मुक्तमणी ढाळ देत ।
रत्न चुंणी हेलावत । तेजलहरी लोटती ॥ २७ ॥
तें तानवडें सुंदरी । रायें वाइली राजकुमरी ।
ज्याच्या तेजापुढें थोरी । सूर्यप्रभेची झांकली ॥ २८ ॥

---

१ शोभन, मंगल कार्य. २ झाडोरा=गर्द झाडी. ३ " रानें माळें " पाठांतर. ४ " प्रकार " पाठांतर. ५ प्रभा, प्रकाश. ६ हिरा. ७ बायकाचा कानांतील दागिना, कुडकें.

सातखणी[1] पांचखणी । मुक्तें झुबके रत्न चुणी ।
पंखे[2] झमकती तेजखाणी । सीसफुल झमकतें ॥ २९ ॥
माथां जाळी तेज सतेज । मुक्ताफळाचें फांके तेज ।
सर्व भूपणा भूपणराज । मस्तकमणी शोभला ॥ १३० ॥
फरो आणी नागरफणी । ढाळ देती रत्नचुणी ।
मुक्ति गुंफिलिसे वेणी । पुष्टी भागी मिरवे ॥ ३१ ॥
मुक्ति गुंफिले झुबके । रत्नमणी गोफ निके ।
कसर्ण्या गोंडे मंगलिके । जोडा जोड मिरवती ॥ ३२ ॥
तेजोरासी रत्नमाळा । लखलखाट मुक्तमाळा ।
सर्व तेजा आगळा । तो विजवरा कपोलीं ॥ ३३ ॥
जांबुनदाच्या झगझगित । मोहनमाळा त्या लखलखित ।
चापेकळियां मिरवत । चापेकळी जानकी ॥ ३४ ॥
नासिकीं शोभलें भूपण । सकळ तेजाचें वरवेपण ।
मंगळरूप सुलक्षण । मुक्ताफळ मिरवे ॥ ३५ ॥
राजभूपणें चढ चढे । हार हेमेर मुक्तें जाडें ।
त्या रत्नाच्या उजेडें । विश्व तेजस्वी भासे ॥ ३६ ॥
बाहु दंडीं विभूपणें । खचित रत्नाचीं भूपणें ।
वांकी बैसल्या वरवेपणें । कीर्तिमुखें मिरवती ॥ ३७ ॥
सुढाळ घोश रत्नमणी । जिनस जिनसीं बैसल्या चुंणी ।
तेजोरासी सुलक्षणी । बाजुबंद शोभले ॥ ३८ ॥
तया तळीं कसण्या जोड । मुक्त झुबके रत्नें जाड ।
राया मनीं जें जें कोड । तें तें भूपणें वातसे ॥ ३९ ॥

---

१ सात आणि पांच खणांची खणाळी. २ चोळीचा अर्धा भाग. ३ डोक्यां-...ल फुल. ४ "झळकतें" पाठांतर. ५ पिंपळवन. ६ कसणें=बांधणें. कसण्या गोंडे=गुफिलेले गोंडे की काय ? ७ बिंदीला मध्यभागीं असणारें पान. ८ कपा-ळावर. ९ पुतळ्यांच्या माळेचा च एक प्रकार. १० सोन्याच्या बारिक कळ्यांची माळ. ११ "हमेळा" पाठांतर पण अर्थ काय ? १२ हिरे.

तेजोरासी लखलखाट । रत्नचुणी बैसल्या दाट ।
सुढाळ मुक्तें कांठोकांठ । नागरंचुडा नागरे ॥ १४० ॥
रत्नखचित कंकणें । हातसांकळिया सुलक्षणें ।
पुढें पोवेची धरवेपणें । रत्नमुद्रिका दाटल्या ॥ ४१ ॥
कटप्रदेशीं मेखळा । दिव्य शोभे जनकबाळा ।
पाउलीं नेपुरांचा मेळा । वाकी वाळे साखळ्या ॥ ४२ ॥
सामुद्रिकें तें पदकमळें । भूषणें बाइलीं सुढाळें ।
आंगोळिकें तें वर्तुळें । विभूषणें दाटलीं ॥ ४३ ॥
रायें वाइलें अमित । मैथळी भांगारजडित ।
ते मी वर्णावया नव्हे शक्त । यथामति बोलिलें ॥ ४४ ॥
पीतांबर मुक्तमंडित । तेजोरासी झमकत ।
उत्तम वैरणें विराजत । रायें जानकी बाइले ॥ ४५॥
भाळीं किंचित कस्तुरी । चंदन लाविलें कुसरी ।
मग सुमनें वहुपरी । माळा गळां घातल्या ॥ ४६ ॥
परिमळ धुशरी उत्तमा । रायें पूजिली मनोरमा ।
फळ समर्पी त्या संभ्रमा । विश्व पाहों ठाकलें ॥ ४७ ॥
कनक वस्त्रें अमोलें । जरी पाटावें वहुमोलें ।
तगट तगटें जिनसालें । कुसुंबी पातळें फळीची ॥ ४८ ॥
जिनस घड्या झगझगिती । तेजोरासी झळकती ।
घड्या घड्या लखलखिती । रायें जानकी वाइल्या ॥४९॥
दाळिंबवानें जासवानें । आंत बाहेरी नुसधें सोनें ।
आणी कितीकें मेघवानें । मुक्तमणी कंचुक्या ॥ १५० ॥

---

१ "काटो काट" पाठांतर २ बागड्या. ३ पोंची. ४ "बोलिलों" पाठांतर. ५ एक नेसण्याला आणि दुसरी पांघरण्यास अशा दोन चिरड्या वधूला देतात, त्यापैकीं पांघरावयाची जी चिरडी असते तिला वैरण म्हणतात. ६ लुगड्याचा प्रकार. ७ "बहुसालें" पाठांतर. ८ "फळाची" पाठांतर. ९ डाळिंबी व जास्वंदी रंगाचीं लुगडीं. १० "नुसतें" पाठांतर.

किती चापेवर्णी अंबर । क्षीरोदक पीतांबर ।
मुक्तमणीचे पदर । मध्यें मुक्तें चित्रिलीं ॥ ५१ ॥
जांबुनदाचें सुत । कुसुंबी रंगें मिश्रित ।
नाना रंग चित्रविचित्र । वस्त्रें रायें वाइलीं ॥ ५२ ॥
त्रैलोक्यामध्यें उत्तमें होती । देवांगातिल उंच जाती ।
तें तें चीरें[1] भूपति । जनकनंदनी वाइली ॥ ५३ ॥
अभिनव चीरें तें विराजे । सभा डवरली त्या तेजें ।
तटस्त सकळांचीं नेत्रांबुजें । अभिनव अंबरें वाइलीं ॥५४॥
द्रौपदी पुरविलीं चीरें । जिनसें वर्णिली कवेश्वरें ।
जानकी रमा साचोकारें । काये ह्मणोनि वर्णावी ॥ ५५ ॥
जाड भांगारमांदुसा । आळंकारपेट्या बहुवसा ।
अनर्घ्य भांगार[2] उजळली दिशा। अपार तवकें वाइलीं॥५६॥
केणें[3] समर्पिलें जनकजे । ज्याच्या स्वादा पीयूष[4] लाजे ।
ऐसें फळ नसे दुजें । सुरवर आश्चियें दाटले ॥ ५७ ॥
नाना जिनसी फळप्रदान । जानकी वाइलें शोभायमान ।
पूगीफळें आणी पानें । सांग फळ वाइलें ॥ ५८ ॥
फळ वाटलें अपार । तेथें नाहीं लाहान थोर ।
सकळां तृप्ती जयजयकार । थोर तेव्हां दाटला ॥ ५९ ॥
मग ते जनकाची नंदनी । सांग फळातें पावोनी ।
थोर सन्मानें करूनी । मातृदर्शना आली ॥ १६० ॥
पुढिलिये समासीं रघोत्तमा । माळ घालील मनोरमा ।
वेणी ह्मणे त्या संभ्रमा । श्रोते जनीं परिसावें ॥ १६१ ॥
इति श्रीरामायणे । आदिकांडे सीतास्वैवरोनाम । समास ॥ ९ ॥

---

१ वस्त्रें. २ "भार" पाठांतर. ३ जिनस. ४ अमृत.

## ॥ समास दहावा ॥ १० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

तों रोमहर्षण मार्कंडेय । पुरोहितसमुदाय ।
मिथिळा जाणविती समय । घटिका चाले सत्रावी ॥ १ ॥
शतानंदादि ब्राह्मण ऋषी । समस्त बोलती रायासीं ।
मंगळस्नान रामासी । आतां दिल्हें पाहिजे ॥ २ ॥
ब्राह्मण ह्मणती रामा स्नान । करून घ्यावें स्त्रीदान[1] ।
सुंदर मूर्ति शोभायमान । अंबरें सुरेंद्रें फेडिली ॥ ३ ॥
ऋषीब्राह्मणासहित । मूर्ति शोभे मंडपांत ।
चामरें ढाळिती श्रीमंत । भक्त दुभार्गीं दाटले ॥ ४ ॥
तों किती येकी सुंदरा । दिव्यांगना मनोहरा ।
अक्षवाणी सीतावरा । निंबलोणें उतरिती ॥ ॥ ५ ॥
शुभासनीं मदनमूर्ति । फुलेलें चाफेलें माखिती ।
हळदी सर्वांगीं लाविती । शुभरूप तनूसी ॥ ६ ॥
कोमळ तनु नीळवर्णी । उटितां बोलती वऱ्हाडिणी ।
परम सुंदर च्यापपाणी । पाहिला चि पाहा गे ॥ ७ ॥
किती ह्मणती हे[2] सहजा । थोर सुकृति मिथिळराजा ।
हे भाग्याची जनकात्मजा । भुवनसुंदर लाधली ॥ ८ ॥
पाहा गे जीवाचें जीवन । पाहा कौसल्यानंदन ।
सुंदर शाम विराजमान । मना नयना आवडे ॥ ९ ॥
नाना विळास उपचारीं । माखण जालें कुसरी ।
हळदी लाविली सुंदरी । सुंदर तनु विराजे ॥ १० ॥
रत्नकळसा कनकतार । सुतविले[3] ते सुंदर ।
तयामध्यें सीतावर । रत्न चौकीं शोभला ॥ ११ ॥

१ "गे" पाठांतर. २ "साजिरी" पाठांतर. ३ सूत गुंडाळलें.

हेमपात्रें गंगाळें । उदकें सारिलीं निर्मळें ।
मंत्रघोश तेणें काळें । आणी वाद्यें वाजती ॥ १२ ॥
सुगंध चोखणी लाविती शिरीं । उदकें घालिती कुसरी ।
कुरळ पसरले पुष्टीवरि । सुंदरपणें मिरवती ॥ १३ ॥
तो सोहळा सुरवर । पाहाती करिती जयजयकार ।
राजा आनंदें निर्भर । अंबरें घेऊन उभा असे ॥ १४ ॥
उदक घालिती खळाळ । तनु साजिरी दुर्वादळ ।
मंगळस्नान निर्मळ । निर्मळाचें जालें ॥ १५ ॥
सोनेसळाचा[1] पुटीं । तनु पुसिती गोमटीं ।
पीतांबर जगजेठी । परिधान केले ॥ १६ ॥
विशाळ भाळीं लखलखिक । केशर कस्तुरीचा टिळक ।
शोभला मंगळदायक । मंगळराम विळासे ॥ १७ ॥
कनकताटीं सुंदरा । आरत्या घेऊन नागरा ।
वोवाळिती सीतावरा । अक्षवाणी ते काळीं ॥ १८ ॥
सुंदर साजिऱ्या मुखकमळा । आरत्या करून सकळा ।
मग ते पायमंडे[2] सोहळा । विळासमूर्ति चालतां ॥ १९ ॥
चरणीं नेपुरांचा गजर । पाउलें साजिरी सुंदर ।
माहा संभ्रमें सीतावर । मधुपर्कपूजे आणिले ॥ २० ॥
स्वस्तिवचनाचा दाटला ध्वनि । राम शोभे सिंहासनीं ।
चामरें करीं घेउनि । भक्त दुभागीं दाटले ॥ २१ ॥
वशिष्ठादि ऋपेश्वर । पुरोहित मुनिवर ।
ब्राह्मणमात्र लाहान थोर । मंत्रघोश दाटला ॥ २२ ॥
सबाह्य शुचि जनकराजा । दिव्य सर्वे सुमेधा भाजा ।
ब्राह्मणमंत्रीं रघुराजा । पूजिता जाला संभ्रमें ॥ २३ ॥
जें योगियाचें विश्रांतिस्थान । जेथें रमेचें भजन ।
जें भक्तांचें समाधान । मंगळ पाउलें रामाचीं ॥ २४ ॥

---

१. सोनसळा=जरीकांठी (वस्त्र). २ पायघड्या.

वंदूनि जनकें सुंदरें । करीं धरिलीं मनोहरें ।
तों तें भूषणें अपारें । पदपंकजीं झळकती ॥ २५ ॥
तोडर श्रीदाचा त्यावरी । मंगळ पाउलें हृदई धरी ।
सकळ गर्जले जयजयकारीं । धन्य भाग्य जनकाचें ॥ २६ ॥
राया स्मरेना कांहीं । वृत्ति तन्मय रामपाईं ।
मग ते अवस्था ते समई । मिथिलेशा नावरे ॥ २७ ॥
तेथें योग वऱ्हाडी मिरवे । निशब्द अक्षराचे उठावे ।
रामपदांबुजीं हे थोरावे । समस्तांचे वारले ॥ २८ ॥
भ्रमनाशकें पदांबुजें । मंगळरूप मंगळराजे ।
सर्व भूषणीं तेजःपुंजें । जनका करीं शोभती ॥ २९ ॥
त्या तळवा शोभायमान । सकळ सामुद्रिकाचें अधिष्ठान ।
जेथें सुरंग रंगोन । अरुण शोभा पावला ॥ ३० ॥
ऐसीं तीं पाउलें सुंदरें । रत्नताटीं मनोहरें ।
जनक धूतसे प्रेमभरें । उदक घाली सुमेधा ॥ ३१ ॥
रामपाउलें सुंदर । परम कोंवळीं सकुमार ।
रायें कर अरुवार । सुलीन दशे धूतलीं ॥ ३२ ॥
राजस चांगलीं वरवंटें । सुंदर सुलक्षणें चोखटें ।
जनकभावार्थ शुद्ध पटें । निर्मळें निर्मळ पुसिलीं ॥ ३३ ॥
मग ते धगधगीत विभूषणें । नवरत्नाचीं कोंदणें ।
राजा वाहातसे आभरणें । भूषण पाउलीं उल्हासें ॥ ३४ ॥
सम पाउलें सुनीळ । रत्नखचित नेपुरें चाळ ।
सुंदर वाकीची फाके कीळ । अंदु त्यावरी झणकती ॥३५॥
पदपंकजीं भूषणा । रायें वाइली विभूषणा ।
त्या पाउलां सुलक्षणां । ते ते परि राजले ॥ ३६ ॥

---

१ विमळ कोंवळीं तेजपुंजें । नीळवर्णी मंगळराजें ॥ असा पाठ दुसऱ्या व तिसऱ्या चरणांचा वाडांत आहे. २ " कोमळ " पाठांतर. ३ मृदु, नाजुक. ४ " नवरत्नजुणी " पाठांतर. ५ " घातसे " पाठांतर.

ह्मणे ये समईची पूजा । समस्त भूषणें रघुराजा ।
समर्पीन परि दुजा । तोडर कैंचा आणावा ॥ ३७ ॥
राजा आवडी बोलोन । भूषणें वाइलीं नूतन ।
तोडर तो पुरातन । पद्पंकजीं ब्रीदाचा ॥ ३८ ॥
वीज झळकली अंबर । जनकरायें पीतांबर ।
उकलिला दिनकर । कोटि नेणों उगवले ॥ ३९ ॥
अभिनव आवडीची गति । ह्मणे सुंदरा सीतापति ।
अंगिकारावें मदनमूर्ति । परिधान केला राघवें ॥ ४० ॥
जनकभाग्याचा सोहळा । कनकमणीची मेखळा ।
नाना रंगाच्या फाकती कीळा । तेजलहरी लोटती ॥ ४१ ॥
राजा बोले पुरुषोत्तमा । अंगिकारावी हे उत्तमा ।
सगुणमूर्ति सुंदरशामा । कटीं मेखळा शोभली ॥ ४२ ॥
तया सेजारीं किंकिणी । लखलखिती रत्नचुणी ।
कटप्रदेशीं बरवेपणीं । मेखळेसेजारी शोभले ॥ ४३ ॥
जांबुनदाचे गाळीव । तंतु मृद सोलिव ।
सकळ तेजाची बरव । तें ब्रह्मसूत्र वाइलें ॥ ४४ ॥
सखोल नाभी सुरेख । जेथें सांठवलें ब्रह्मादिक ।
चोज करून जनक । हृदईं पदक घातलें ॥ ४५ ॥
अनर्घ्य रत्नाच्या माळा । जिनस रंग सुढाळा ।
तेजोरासी फाकती कीळा । आपादपर्यंत घातल्या ॥ ४६ ॥
रत्नखचित वीरकंकणें । पंकजपाणी सुलक्षणें ।
पोंचेची वाइली बरवेपणें । हातसाखळे मिरवली ॥ ४७ ॥
नाना रत्नाचीं कोंदणें । मुद्रिका शोभल्या बरवेपणें ।
परम सुंदर सुलक्षणें । आंगोळिकें दाटलीं ॥ ४८ ॥
बाहु दंडीं विभूषणें । रायें वाइली भूषणें ।
सुंदर रामा सुलक्षणें । ते ते पारि शोभलीं ॥ ४९ ॥

---

१ " झळकती " पाठांतर.

धगधगीत मकराकारें । सतेज झळकती सुंदरें ।
तें कुंडलें मनोहरें । कर्णीं विराजे ॥ ५० ॥
मुगुटकिरटीची कुसरी । नाना रत्नांचीं कोंदणें वरी ।
नेत्र कोंदले प्रकाशकरी । तेजलहरी लोटती ॥ ५१ ॥
मुगुट शोभला सुलक्षणा । किरटी दावी वरवेपणा ।
रामा सर्वांच्या भूपणा । जनकें भूपणें वाइलीं ॥ ५२ ॥
पीतांबर तेजोरासी । झळके धिकारी विजुसी ।
जनकरायें संभ्रमेंसीं । तें प्रावर्ण वाइलें ॥ ५३ ॥
टिळक लाविला केशरी । कुंकुम अक्षता त्यावरी ।
मग सर्वांगीं कुसरी । वावन चंदन चर्चिला ॥ ५४ ॥
विमळा आणी रसाळा । आपादपर्यंत सुमनमाळा ।
रायें वादल्या मंगळा । परिमळ धुशरीं पूजिलें ॥ ५५ ॥
सकळ पाहाती ते काळीं । देव जन भूमंडळीं ।
नाना उपचार विल्हेळीं । जनकें जावाई पूजिले ॥ ५६ ॥
राजा विचारी मनासी । जानकी दिल्ही रामासी ।
ईच्या तोलें दक्षणेसी । येक असे ते समर्पूं ॥ ५७ ॥
अनंत तपाच्या अवगंणा । जोडिलें विदेहनामा भूपणा ।
जनकें ते वरदक्षणा । वरद्करीं घातली ॥ ५८ ॥
विदेह नामाचा हेत । विर्धीभूगोळीं न मायेजेत ।
जनकें केला रामार्पित । सुखस्वानंदें निवाला ॥ ५९ ॥
कोण आश्चिर्य गहन । वैकुंठनाथ रघुनंदन ।
जनक जावाई पुजून । मधुपर्क मांडिला ॥ ६० ॥
दोहीं दळीचे पुरोहित । ब्राह्मणमंत्र गजगजित ।
दधि मधु श्रीमंत । करीं रायें घातला ॥ ६१ ॥

---

१" मनोहर वर्णी शोभली । " पाठांतर. २ विद्युन्तेला. ३ मैलागदचंदनवृक्ष.
४ " विल्हाळी " पाठांतर=प्रकारानीं (?) मागील ४X४० व ८ X ७२।७४ पद्य.
५ "आगवणा" पाठांतर. अवगण=त्याग. अंगवण=स्वेच्छा, सामर्थ्य. ६ ब्रह्मगोळीं व भूगोळीं. ७ " जनक जावाईपूजन । मधुपर्काचें मांडलें ॥ " पाठांतर.

विध जाला शोभायमान । शुध सारिलें आचमन ।
मधुपर्कांचें पूजन । सीतावराचें जालें ॥ ६२ ॥
तव शतानंद ह्मणे मिथिळा । भरोन गेल्या घटिका सोळा ।
आतां सत्रावी सोहळा । हे हि भरों चालिली ॥ ६३ ॥
सकळ ब्राह्मणीं हे चि बोली । पूर्ण घटिका भरों आली ।
आतां जानकी आणिली । पाहिजे राया ॥ ६४ ॥
थोर आनंद मिथिळेश्वरा । केव्हां देखेन वधुवरां ।
सीता आणाव्या सुंदरा । अति संभ्रमें चालिला ॥ ६५ ॥
चहुं वेदि सर्व ब्राह्मण । मंदिरीं प्रवेशला आपण ।
तव ते गौरीहरि सुलक्षण । श्रीमंगळा जानकी ॥ ६६ ॥
सखिया सांगातिणी जिवलगा । रामप्राप्तीच्या अंतरंगा ।
चामरें ढाळिती दोही भागा । सिंह्मासनीं जानकी ॥ ६७ ॥
तनु सुंदर आणी कोवळी । रसाळ वीर्के पिवळी ।
तप्त कांचनपुतळी । जनकरायें देखिली ॥ ६८ ॥
नाना आळंकारें विराजमान । पीत कंचुकी पीत वसन ।
सर्वांगीं ते शोभायमान । नागर हळदि नागरे ॥ ६९ ॥
गौरीहराची पूजा । सांग केली सलज्जा ।
अधोमुख ते जनकजा । थोर आनंद अंतरीं ॥ ७० ॥
सखिया हांसती कौतुकें । पूजाफळ लाधलें निकें ।
सुंदर रामासारिखें । अक्षई वर जानकी ॥ ७१ ॥
वधु करिती अक्षवाणें । माता वोवाळी निंवलोणें ।
जनकरायें सुलक्षणें । कडिये घेऊन आला ॥ ७२ ॥
ते समई अनेकें । आंत बाहेरी मंगळाष्टकें ।
शुधें आणी नेमकें । विद्यापात्रें गर्जती ॥ ७३ ॥
वाशिष्ठादि सप्त ऋषी । धरून दिव्य अंत्रपटासी ।
राम उभे लग्नासी । येरीकेडे जानकी ॥ ७४ ॥

१ सौंदर्य, तेज. २ दुसऱ्या बाजूला.

जनक राजा दशरथ । वऱ्हाडी आणी पुरोहित ।
विभागले मंडपांत । उभे राहिले दुभागीं ॥ ७५ ॥
अंत्रपाटीं राम सीता । वधांजुळी अक्षता ।
सुवासिनी मंगळमंडिता । आरत्या दुभागीं दाटल्या ॥७६॥
देवीं दाटलें गगन । समस्त तुरें जालीं लीन ।
मंगळाष्टकें सावधान । थोर घोश दाटला ॥ ७७ ॥
चहु वेदींचीं जिनसें । ह्मणती विशेषविशेषें ।
घोश दाटला सावकाशें । सावधान वचनाचा ॥ ७८ ॥

## ॥ मंगळाष्टकें ॥

आरंभीं वदती महा गणपती हे शारदे सुंदरी ।
शुभे वाणि वदे सुवेळ विलसे तूं मंगळे माधुरी ॥
रामा जानकि माळ घेउनि करीं ऊभी असे सुंदरी ।
तों ते सादर वैखरी शुभ वदे सीतावरं मंगळं ॥ १ ॥

गर्गाच्यार्य ह्मणे विदेहतनया लक्ष्मी सिता बाळिका ।
सर्वां ईश परेश हा वर इचा तुह्मी पहा नेटका ॥
रत्नेंमंडित साजिरी द्वय करीं माळा जगन्नायका ।
आतां घालिल जानकी रघुविरा सीतावरं मंगळं ॥ २ ॥

ऋषी ब्राह्मण बोलती रघुविरा सर्वोत्तमया सुंदरा ।
रामा राजिवलोचना रघुपते माळा करीं नागरा ॥
ऊभी तिष्ठत राहिली जनकजा स्त्रीदान आंगीकरा ।
सर्वां तोष विशेष घोष उठला सीतावरं मंगळं ॥ ३ ॥

भारद्वाज पुढें अगस्ति ऋषि तो मार्कंड बोले बळें ।
जे कां मंगळधाम सुखजनितें नेपूर तें निर्मळें ॥
सीतानाथपदांबुजें रमणियें चित्तीं धरा केवळें ।
सर्वां प्राप्ति असे सुवेळ विलसे सीतावरं मंगळं ॥ ४ ॥

---

१ श्रीसमर्थचरित्रात हा "सावधान" शब्द फार महत्वाचा आहे आणि ह्मणून तो शब्द थोडें हि आला ह्मणजे श्रीसमर्थांचे सारें चरित्र आठवतें. द्विज सावधान ऐसें सर्वत्र विवाहमंगळीं ह्मणती । तें एक रामदासें आयकिलें त्या अशो सदा प्रणती ॥

नागरे आणी गोजिरी । सुंदरे आणी साजिरी ।
आवडती बहुपरी । राजस ते रमणीये ॥ ९६ ॥
उपमे नांहीं या दुसरें । ये चि भुवनत्रंई सुंदरें ।
रामजानकी वधुवरें । येक येकाच्या पाडें ॥ ९७ ॥
पाडें पाडें रूपवंतें । पाडें पाडें गुणवंतें ।
पाडें पाडें भूपणेंवंतें । येकपणें साजिरीं ॥ ९८ ॥
राये राये सकळ जन । कवतुक पाहाती शोभायमान ।
सुरादि विमानें विमान । समीप अंतरें दाटली ॥ ९९ ॥
तव ब्राह्मणाच्या मंगळध्वनी । विधियुक्त देव अग्नी ।
लाज्या होमा पूजनीं । अति संभ्रमें आणिती ॥ १०० ॥
परमानंदें हुतांशन । कनकपात्रीं घेऊन ।
ब्राह्मण मंत्रीं झांकून । सुवासिनी आणिला ॥ १ ॥
आगरचंदनें प्रदीप्त । धूमेंविण विराजत ।
अग्निदेव तो दिसत । परम शोभायमान ॥ २ ॥
उभय दळींचे पुरोहित । ऋपी ब्राह्मण अमित ।
लाज्यां होम विधियुक्त । संभ्रमेंसीं मांडला ॥ ३ ॥
बोउला राम जगजेठी । सव्या भागीं ते गोरटी ।
ऋपीब्राह्मणांची दाटी । कडक मंत्र घोशाचा ॥ ४ ॥
वरदपाणी सुंदर । जोड्डनिया अमृतंकर ।
अग्नी पूजी सीतावर । सर्व विधि जाणता ॥ ५ ॥
सुंदराचा सव्य कर । आज्यें दिसे मनोहर ।
अग्नी अवदानें उपचार । येथासांग विध जाला ॥ ६ ॥

---

१ " भूपणें तें " पाठांतर. २ " मंत्रध्वनी " पाठांतर. ३ अग्नि. ४ " लग्न " पाठांतर. ५ " आंबृतकर " पाठांतर. हा निराळा पाठ येथें अशासाठीं दिला आहे कीं तत्कालीन पुष्कळ रामदासी ग्रन्थांतून " अमृत " बद्दल " आंबृत " आढळतें हें वाचकांस आठवावें. श्रीमत् दासबोधांत आहे च. ६ आज्य=घृत, तूप.

लाज्या होमाचा उछाव । थोर मांडला नवलाव ।
ऐकोनि श्रोता आयुर्भाव[1] । आशंका घेतली ॥ ७ ॥
आशंकेचा उपक्रम । दिवसां नाहीं लाज्या होम ।
शास्त्रबाहे[2] विषम । कां या कवि बोलिला ॥ ८ ॥
तरि लाज्याहोमाचा आवसरीं । शशी जालासे छत्रधारी ।
सप्त ऋषी संभ्रमेंकरी । विधी विधान सांगती ॥ ९ ॥
लाज्याहोमाचें कौतुक थोर । वरदकरीं जानकीकर ।
आज्यें लाज्यां[3] सुंदर । मंगळ मेहुणा घालितसे ॥ ११० ॥
अग्नी पडती अवदानें । ब्राह्मणमंत्रीं शोभायमानें ।
लाज्याहोम संभ्रमानें । येथसांग जाला ॥ ११ ॥
ब्राह्मण ह्मणती रघोत्तमा । अग्नी साक्ष गृहस्ताश्रमा ।
वामांग पावली मनोरमा । स्व आश्रमा चालावें ॥ १२ ॥
तों त्या जनकाची प्रार्थना । ह्मणे कौसल्यानंदना ।
मैथिळीसी जगजीवना । चतुर्थी येथें करावी ॥ १३ ॥
सकळ मंगळ अक्षतां । वाम भागीं शोभे सीता ।
गृहप्रवेश विधियुक्ता । होम मंगळ मांडला ॥ १४ ॥
शोभा दाटलीसे नागर । ब्राह्मणमंत्राचा गजर ।
जानकीचा सव्य कर । वरदकरा लाविती ॥ १५ ॥
सकळ मंगळ आलंकृता[4] । तुपें मिश्रित अक्षता ।
वरदकरीं विराजता । जनकनंदनी घालितसे ॥ १६ ॥
अग्नी आहुती पडती । ब्राह्मणमंत्रीं घवघविती ।
उभय करींचीं झळकती । लग्नकंकणें भूषणें ॥ १७ ॥
अग्नी आहुती विराजमान । घालितसे जगजीवन ।
धगधगीत हुताशन । परम शोभता जाला ॥ १८ ॥

---

१ आविर्भाव　२ शास्त्रबाह्य, निषिद्ध　३ याठांत "लाज्या" ऐवजीं सर्वत्र "लज्या" आहे, पण या ठिकाणा मात्र "लाजा" आहे व तो च पाठ बरोबर आहे.　४ "आळंकृता" पाठांतर.

सुंदराचा पीयूषपाणी । अग्नी तृप्त जाला जेवणी ।
ब्राह्मण ह्मणती च्यापपाणी । प्रदक्षणा पाहिजे ॥ १९ ॥
वेदां वेदपण ज्याकरितां । शास्त्रां भूषण वाढविता ।
सर्व विधीतें जाणता । ब्राह्मणवचनें उठिला ॥ १२० ॥
उभा जानकीरमण । वधुसहित सुलक्षण ।
उभय रूपाचें वरवेपण । पाहाण्या ठक पडिलेंसे ॥ २१ ॥
पुढें लावण्यपुतळा । मागें सीता दिव्य वाळा ।
उभय चरणीं येकवळा । भूपणें जिनस वाजती ॥ २२ ॥
तें वोहर आलोलिक । पाहातां निवाले तिन्ही लोक ।
ब्राह्मणमंत्रीं मंगळिक । प्रदक्षणा जाल्या ॥ २३ ॥
अग्नीपूजा जाली सांग । सीतेसी शोभे सीतारंग ।
मंत्राक्षताचा प्रसंग । थोर घोश दाटला ॥ २४ ॥
चहु वेदीच्या सुंदरा । नाना धाता जिनसवारा ।
मंत्राक्षता सीतावरा । ऋपी ब्राह्मणी वाइल्या ॥ २५ ॥
त्रैलोक्य तेव्हां जयजयकारें । दुंदुभी लागलीं मंगळ तुरें ।
ते समईं मंगळोत्तरें । आशीर्वाद द्विजाचे ॥ २६ ॥
मंगळ भूपणें मंडित । मंगळ शोभा विराजत ।
मंगळधाम सीताकांत । मंगळ वोउेला विराजे ॥ २७ ॥
लक्षानलक्ष वधु जन । मुक्तीं शेप भरून ।
आरातिया विराजमान । निंबलोण उतरिती ॥ २८ ॥
पुढिलिये समासीं सुनमुख । हळदि उटणें अलोलिक ।
वेणी ह्मणे कवतुक । श्याकार श्रोतीं परिसावा ॥ १२९ ॥

इति श्रीरामायणे । आदिकांडे सीतास्वैवर नाम समास दहावा ॥ १० ॥

---

१ एकोप्याने, एक समयी. २ "समस्त" पाठांतर. ३ बाडांत बहुधा सर्वत्र "बोउला" आहे पण या च ठिकाणी "वोहुला" आहे.

# ॥ समास अकरावा ॥ ११ ॥

॥ श्रीरामकर्ता ॥

तों तें मंगळ यानें तुरें । राजांगना उपचारें ।
देवी कौसल्या गजभारें । सुनमुख पाहों आली ॥ १ ॥
वैस वैसकार येथोचित । राजराण्या विराजित ।
देवस्त्रिया अमित । आरत्या करीं दाटल्या ॥ २ ॥
तव ते कौसल्या जननी । सर्वे वडिला सुवासिनी ।
शुक्तीं शेष भरूनि । जीवें वोवाळी वधुवरा ॥ ३ ॥
ब्राह्मणमंत्रीं शोभायमान । देवीजानकीचें पूजन ।
अति संभ्रमें विराजमान । कौसल्या करिती जाली ॥ ४ ॥
द्विज मंत्राचे उच्चार । जानकी वाहातसे भांगार ।
बावन्नकसी आळंकार । हिरवे कनक रत्नाचे ॥ ५ ॥
हिरव्या रत्नाचे आळंकार । भोवेन्या कारलें भांगार ।
जानकी वाहातां सुंदर । सभा हिरवी भासली ॥ ६ ॥
हिरव्या कनकाच्या कीळा । हिरवें दावी रविमंडळा ।
चंद्र आणी नक्षत्रमाळा । भूगोळ हिरवा भासला ॥ ७ ॥
हिरवें कनक तेजोरासी । हिरवीं रत्नें कोंदणासी ।
सुंदर भूषणें जिनस जिनसी । माता कौसल्या वाहातसे॥८॥
देवांगवस्त्रें निवडकें । नाना जिनसी अमोलिकें ।
*कनकतगटीं कितीयेकें । मुक्तमणी चित्रिली ॥ ९ ॥*
शुक्त कंचुक्या तेजोरासी । रत्नमाळा जिनस जिनसी ।
सांग पूजा मैथळीसी । कौसल्येनें वाइली ॥ १० ॥
केणें वाइलें अपार । सुनमुख पाहिलें सुंदर ।
मंगळराज वधुवर । हळदिउटणें मांडलें ॥ ११ ॥

---

१ "वातसे" पाठांतर. २ ?. ३ "वातां" पाठांतर. "वाहाणें" बद्दल बाडांत सर्वत्र "वाणें" असा पाठ आहे; तेव्हां आतां पुढें या शब्दाचें पाठांतर टिपेंत देणें नको.

मंगळ मंडित वधुवरें । विराजमान सुंदरें ।
दुभागीं ढळती चामरें । विंजणे[1] किती येक वारिती ॥ १२ ॥
ब्रह्मदेव वासिंगेंसीं । इंद्र घेऊन हारासी ।
कुवेर उभा द्रव्येंसी । वोवाळणीकारणें ॥ १३ ॥
हळदिउटणें सुंदर शामा । आतां करील मनोरमा ।
तो सोहळा संभ्रमा । त्रैलोक्य पाहों ठाकलें ॥ १४ ॥
राम पाउलें मनोहरें । सुंदराचीं सुंदरें ।
सम साजिरीं जगदाधारें । राजस तीं[2] वरवंटें ॥ १५ ॥
जे[3] योगीयाचा निज ठेवा । जे[3] विश्रांतीचा हि विसावा ।
भक्तीं[4] वेंचूनि जीवभावा । उपासिती स्वानंदें ॥ १६ ॥
ते सुगंध अक्षतीं पूजिली । सखीया ह्मणती गे वेहिली[5] ।
मस्तक ठेवी रामपाउलीं । हळदिउटणें चालों दे ॥ १७ ॥
तें पाउलें जनकनंदनी । आपुली मिरासी लाहोनि ।
सलज्ज ते अधोवदनी । सुखस्वानंदें न्याहाळी ॥ १८ ॥
जेथें नेपुरें वांकी साजते । अंदु तोडर विराजते ।
सामुद्रिकें साजिरीं तें । तळवे आरक्त नीळवर्णी ॥१९॥
आंगोळिका वरवेपणें । नखें वर्तुळें परिमाणें ।
तेजपुंज सुलक्षणें । पाहातां जानकी विंबली ॥ २० ॥
पदसरोज[6] तेजपुंजा । नखीं विंबली जनकात्मजा ।
देखणें वृत्तीची गजगजा । फांपावत चालिली ॥ २१ ॥
नखीं विंबले सकळ भक्त । शेपशाई मूर्तिमंत ।
जान्हवीतीर विराजत । तापस सिद्ध दाटले ॥ २२ ॥
तीर्थे व्रतें तपें दानें । ऋषियाग विधि विधानें ।
साधनादि पुनश्चरणें । मंत्रमाळा विंबल्या ॥ २३ ॥

---

१ "विंझणे" पाठांतर. २ "ते" पाठांतर. मागें एका ठिकाणीं असा च-शब्दशः चरण आला आहे, तेथें हि हें पाठांतर आहे च. ३ "जो" पाठांतर. ४ वाडांत "भक्तो" चे "भक्त" केलें आहे. ५ वहिलें=सत्वर, लवकर, ६ पदक्रमक.

शेष कूर्म वराह सकळ । दश दिशा आणी दिग्पाळ ।
देवपुरी कैळास स्थळ । वैकुंठलोक विंवला ॥ २४ ॥
सत्यलोक मेरु सागर । चंद्र सूर्य नक्षत्रभार ।
अनंत ब्रह्मांडाचा विस्तार । नखीं देखे सुंदरी ॥ २५ ॥
जारजअंडजादि खाणीवास । नखीं विंवले योगाभ्यास ।
स्थानमाना सहवास । मोक्ष मुक्ति विंवल्या ॥ २६ ॥
शुकादिक योगेश्वर । व्यासादि कवेश्वर ।
मातृका वेद ॐकार[1] । दर्शनें नखीं विंवलीं ॥ २७ ॥
विचार विवेक खुणा जात । नखीं विंवला येकांत ।
तत्पदादि समस्त । समाधान विंवले ॥ २८ ॥
पुरें पर्वत सरिता । मेघपडळ द्रुम लता ।
आकाश ठाव अंतुता[2] । भूत भास विंवला ॥ २९ ॥
नखीं ब्रह्मांडाचिया खाणी । देखतसे सुलक्षणी ।
पाहाती वृत्ति देखणी । पुरेनासी जाली ॥ ३० ॥
राव राजे तेथें किती । जानकी पाउलें न दिसती ।
ठक पडिलें चित्तोवृत्ति । सुचेनासें जालें ॥ ३१ ॥
नखीं भ्रमली ते सुंदरा । कोण करी नमस्कारा ।
मग ह्मणे रघुवीरा । न कळे महिमा मज दीना ॥ ३२ ॥
ह्मणे जय जय जी जगत्पति । विश्वंभरा कोदंडमूर्ति ।
कोटीच्या कोटी रतिपति । नखीं विंवोन गेले ॥ ३३ ॥
सुंदरा तूं स्वानंदघना । रामा राजीवलोचना ।
जगजीवना पुरातना । मनो वाचा ना फळसी ॥ ३४ ॥
जितुकां कांहीं थोरावा । नखीं विंवला अथवा ।
जय जय जी राघवा । अपार महिमा नेणवे ॥ ३५ ॥
मना आंत वाहेरी । पाहाणें दाटलें वहुपरी ।
तुझिये कृपेनें निवारी । पाउलें दाखवीं सुंदरा ॥ ३६ ॥[3]

---

१ "ओंकार" पाठांतर. २ "आतुता" पाठांतर=आंत. ३ अठराव्या ओवीपासून येथपर्यंत रामपाउलांचें वेणाबाईनीं केलेलें वर्णन किती प्रेमळ आहे!

मग ते भक्तराज गुणवंती । मिरासीची चौथी भक्ति[1] ।
भक्तां सवाह्य श्रीपति[2] । श्रम सहसा बाधीना ॥ ३७ ॥
तव त्या बोलती सुवासिनी । सुंदरे विळासवासिनी ।
राजस पाउलें वंदुनी । हळदिउटणें चालों दे ॥ ३८ ॥
मग ते सलज्जा सुंदरी । राया जनकाची कुमरी ।
रामपाउलें नमस्कारी । येरी ह्मणती हें नव्हे ॥ ३९ ॥
वडिला सांगती जीवें भावें । नमस्कारितां वदावें ।
प्राणवल्लभा करूं द्यावें । हळदिउटणें मज आतां ॥ ४० ॥
तव ते जनकाची बाळी । परमानंदें ते काळीं ।
सुंदरा रामपदकमळीं । मस्तक विळासें ठेविला ॥ ४१ ॥
तव कौसल्येच्या वऱ्हाडिणी । ह्मणती गे सुलक्षणी ।
नमस्कारितां च्यापपाणी । नाम उच्चारें[3] करावा ॥ ४२ ॥
काय बोले मनोरमा । प्राणवल्लभा रघोत्तमा ।
उटणें करूं दे सुखधामा । ह्मणोनि पाउलें वंदिलें[4] ॥ ४३ ॥
जनकनंदनी नमस्कार । करितां नामाचा उच्चार ।
ते समई जयजयकार । सकळांचे दाटले ॥ ४४ ॥
कौतुक पाहाती सकळ । उभी शोभे जनकबाळ ।
राजस तनु ते निर्मळ । हळदि मंगळ लाविली ॥ ४५ ॥
कनक लटंगणे कंकणें । झळकती करीं भूपणें ।
कनकवर्णी वरवेपणें । तनु सकोमळ उटिली ॥ ४६ ॥
मग तें पाउलें सुंदरें । भूपणमंडितें मनोहरें ।
जानकी उटी परिकारें । साजिरी तें रमणीयें ॥ ४७ ॥
निर्मळांगाते निर्मळ । उटणें करून जनकबाळ ।
कुंकुम केशर रसाळ । सुंदर टिळक लाविला ॥ ४८ ॥

---

१ पादसेवन भक्ति. २ "रघुपति" पाठांतर. ३ वऱ्हाडिणींनीं सीतेला उखाणा घ्यावयास सांगितलें. ४ उटणें कराया सुखधामा । प्राणवल्लभा रघोत्तमा । द्यावे पाउला उत्तमा । विनवी भाजा आपुली ॥ अशा तऱ्हेचा कांहीं उखाणा असावा. ५ खुळखुळ करणारीं (?)

सुरंग अक्षता शोभायमान । तनु चर्चिली चंदन ।
सकळ भूषणीं विराजमान । पाउलें सुंदर पूजिली ॥ ४९ ॥
वासिंग बाइले सुंदर भाळा । परमानंदें जनकबाळा ।
सुरंग विमळा सुमनमाळा । आपादपर्यंत घातल्या ॥ ५० ॥
नवल जानकीचा भक्तिरंग । धन्य पूजेचा प्रसंग ।
भक्तां साह्ये सीतारंग । समर्थ पूजा रांजली ॥ ५१ ॥
तव त्या बोलती सकळी । मदनमूर्ति ये काळीं ।
हळदिउटणें मैथळी । आतां केलें पाहिजे ॥ ५२ ॥
वरदराज आंबृतकरें । हळदी लाविली सुंदरें ।
कुंकुम गंध परिकारें । भाळीं मळवट रेखिला ॥ ५३ ॥
तनु चर्चिले चंदन । परिमळधुशरें शोभायमान ।
पुष्पमाळा घालून । वासिंग भाळीं बांधलें ॥ ५४ ॥
जालें हळदिउटणें । वधु करिती अक्षवाणें ।
आरतिया निंबलोणें । लक्षानलक्ष उतरिती ॥ ५५ ॥
दोही दळींच्या पाडें पाडें । जीवें प्राणें बाडेंकोडें ।
रायेराय चढें चढें । बोवाळण्या पडताती ॥ ५६ ॥
कनक तवकें बहुसालें । रत्नें भरिलीं अमोलें ।
रायेराय तोलें तोलें । वोवाळण्या घातल्या ॥ ५७ ॥
दोही दळींच्या वोवाळणी । रायें राय खणाखणी ।
घ्या घ्या शब्दाची दाटणी । सुवर्णवृष्टी येतल्या ॥ ५८ ॥
कनक ताटें बहुसालें । येथेष्ट भरली मुक्ताफळें ।
लक्षानलक्ष तेणें काळें । वोवाळण्या पडताती ॥ ५९ ॥
अष्ट दिशाचे दिग्पति । आपुलीं पदें साह्य संपत्ति ।
वोवाळिती सीतापति । अति संभ्रमें ते काळीं ॥ ६० ॥

१ "चर्चिला" पाठांतर. २ शोभली. ३ अत्यंत. ४ "घेतया" पाठांतर. ५ "विशाळें" पाठांतर. ६ याउपर ही ओवी सत्तावन्नावी आहे.

इंद्रें वोवाळिलें इंद्रपद । चंद्रें वोवाळिलें चंद्रपद ।
विधीस थोर आनंद । सत्यलोक तेणें वोवाळिला ॥ ६१ ॥
हरादि भक्तजन । तेणें पूर्वींच वोवाळिलें तनु मन ।
सुखें पाहाती स्वानंदघन । परमानंदें निवाले ॥ ६२ ॥
हळदिउटण्याचा प्रसंग । विध जाला येथासांग ।
सीतेसहित सीतारंग । परम शोभता जाला ॥ ६३ ॥
ब्राह्मण ह्मणती सुंदरा । सीतेसहित सीतावरा ।
आतां पूजन गौरीहरा । अगत्य केलें पाहिजे ॥ ६४ ॥
ब्राह्मणाचें वचन । पाळक नाम पुरातन ।
मैथळीसी रघुनंदन । गौरीहरी विराजे ॥ ६५ ॥
ऋषी ब्राह्मणाच्या मंत्रध्वनि । नाना उपचारें करूनि ।
उमेसहित शूळपाणी । भक्तवछ्ळें पूजिला ॥ ६६ ॥
आंवा सिंपितां सोहळा । रामअंकीं जनकबाळा ।
सकळ वधु जाल्या गोळा । कौतुक दृष्टी पाहाती ॥ ६७ ॥
पूजा जाली येथासांग । नाना उपचाराचे प्रसंग ।
थोऱ्या संभ्रमें सीतारंग । सभामंडपा आणिले ॥ ६८ ॥
वैरण्या गाठी सुंदरें । रामजानकी वधुवरें ।
शुभमंडपीं उपचारें । शुभासनीं शोभली ॥ ६९ ॥
सभा घनवटलीसे अपार । सूर्यवंशी माहा वीर ।
सीतेसहित सीतावर । मध्य मंडळी शोभला ॥ ७० ॥
पुढें राम सीतापति । थोर आनंदें अयोध्यापति ।
जनकराया सुख चित्तीं । मनाऐसें जालें ॥ ७१ ॥
दोही दळींचे ईडे पाडे । द्याकर मांडिला चढें चढें ।
देवविमानें पुढें पुढें । निकट अंतरें दाटलीं ॥ ७२ ॥

---

१ समर्थें पूजिलें अभिनव । परमानंदें सदाशिव । रामाकारणें जिणें सर्व । तनु मनु वोवाळणी केलें ॥ अशी एक ओवी या ठिकाणी वाडांत जास्त आहे.
२ "सीता सती" पाठांतर.

संभ्रमें आरंभ धाकारासी । जनकें फोडिले भांडारासी ।
अमित केल्या कनकरासी । पर्वत पडिले द्रव्याचे ॥ ७३ ॥
राया दशरथाचा धाकार । अमित भांडारी कुबेर ।
कदाचित ये झुंपुर । द्रव्यशक्ति उभी असे ॥ ७४ ॥
राम जेथें पुत्रपणें । सर्व सांग सकळ गुणें ।
अष्ट माहासिधीचें रावणें । वैकुंठ वोढून आलें ॥ ७५ ॥
मग ते दोही दळींचें दान । कुवेर केला धर्माधीन ।
द्रव्यशक्ति दे भरून । घ्या द्या शब्द उठिले ॥ ७६ ॥
लखलखीत कनकरासी । त्रैलोक्य मिळालें दानासी ।
राया जनकाचे सभेसी । धाकार घमंड मांडला ॥ ७७ ॥
लक्षानलक्ष कनकपात्रें । उंतळें विस्तीर्णें चित्रविचित्रें ।
कनकनाणीं सीगेंमात्रें । समान दान होतसे ॥ ७८ ॥
कोठील ह्मणाल ठेंसील नाणी । पुरातन हे तेजोखाणी ।
राया रामाची ठेवणी । अगत्य आजी उघडली ॥ ७९ ॥
सुंदरें आणी चोखटें । वावन्नकस लखलखाटें ।
कोरिलीं आणी घनवटें । वैकुंठ टसा गाजला ॥ ८० ॥
घ्या घ्या द्या द्या हे चि घोश । कडक उठिला विशेष ।
दान होतसे सावकाश । लाहान थोर न ह्मणती ॥ ८१ ॥
रत्नें माणिकें प्रवाळें । तेजोरासी मुक्ताफळें ।
कनकनाणी तेणें काळें । मिश्रित पात्रीं वाटिती ॥ ८२ ॥
नवरत्नाच्या जिनसा । कोण पुसे वावन्नकसा ।
त्रैलोकीं धाकार नाहीं ऐसा । द्रव्य फुका लागलें ॥ ८३ ॥

---

१ झुपुर ह्मणजे तारडी, पण येथें त्याचा काय अर्थ ? " झुपर " असा पाठ माडांत आहे, पण त्याचा तरी अर्थ काय ? कदाचित् काही अपुरें पडेल ह्मणून द्रव्यशक्ति स्वत च सिद्ध होती, असा काहीं अर्थ करावा २ " वैकुंठ वळानि आणिलें " पाठांतर. ३ उथळ ४ भरपूर भरून. ५ टशाचा. ६ " निदोष " पाठांतर

इंद्रें वोवाळिलें इंद्रपद । चंद्रें वोवाळिलें चंद्रपद ।
विधीस थोर आनंद । सत्यलोक तेणें वोवाळिला ॥ ६१ ॥
हरादि भक्तजन । तेणें पूर्वीच वोवाळिलें तनु मन ।
सुखें पाहाती स्वानंदघन । परमानंदें निवाले ॥ ६२ ॥[1]
हळदिउटण्याचा प्रसंग । विध जाला येथासांग ।
सीतेसहित सीतारंग । परम शोभता जाला ॥ ६३ ॥
ब्राह्मण ह्मणती सुंदरा । सीतेसहित सीतावरा ।
आतां पूजन गौरीहरा । अगत्य केलें पाहिजे ॥ ६४ ॥
ब्राह्मणाचें वचन । पाळक नाम पुरातन ।
मैथळीसी रघुनंदन । गौरीहरी विराजे ॥ ६५ ॥
ऋषी ब्राह्मणाच्या मंत्रध्वनि । नाना उपचारें करूनि ।
उमेसहित शूळपाणी । भक्तवछळें पूजिला ॥ ६६ ॥
आंवा सिंपितां सोहळा । रामअंकीं जनकबाळा ।
सकळ वधु जाल्या गोळा । कौतुक दृष्टी पाहाती ॥ ६७ ॥
पूजा जाली येथासांग । नाना उपचाराचे प्रसंग ।
थोऱ्या संभ्रमें सीतारंग । सभामंडपा आणिले ॥ ६८ ॥
वेरण्या गाठी सुंदरें । रामजानकी वधुवरें ।
शुभमंडपीं उपचारें । शुभासनीं शोभली ॥ ६९ ॥
सभा घनवटलीसे अपार । सूर्यवंशी माहा वीर ।
सीतेसहित सीतावर । मध्य मंडळी शोभला ॥ ७० ॥
पुढें राम सीतापति[2] । थोर आनंदें अयोध्यापति ।
जनकराया सुख चित्तीं । मनाऐसें जालें ॥ ७१ ॥
दोही दळींचे ईडे पाडें । घाकर मांडिला चढें चढें ।
देवविमानें पुढें पुढें । निकट अंतरें दाटलीं ॥ ७२ ॥

---

१ समर्थें पूजिले अभिनव । परमानंदें सदाशिव । रामाकारणें जिणें सर्व । तनु मनु वोवाळणी केलें ॥ अशी एक ओवी या ठिकाणीं बाडांत जास्त आहे.
२ "सीता सती" पाठांतर.

संभ्रमें आरंभ द्याकारासी । जनकें फोडिलें भांडारासी ।
अमित केल्या कनकरासी । पर्वत पडिले द्रव्याचे ॥ ७३ ॥
राया दशरथाचा द्याकार । अमित भांडारी कुवेर ।
कदाचित ये नुंपुर । द्रव्यशक्ति उभी असे ॥ ७४ ॥
राम जेथें पुत्रपणें । सर्व सांग सकळ गुणें ।
अष्ट माहासिधीचें रावणें । वैकुंठ वोळून आलें ॥ ७५ ॥
मग ते दोही दळींचें दान । कुवेर केला धर्माधीन ।
द्रव्यशक्ति दे भरून । घ्या द्या शब्द उठिले ॥ ७६ ॥
लखलखीत कनकरासी । त्रैलोक्य मिळालें दानासी ।
राया जनकाचे सभेसी । द्याकार घमंड मांडला ॥ ७७ ॥
लक्षानलक्ष कनकपात्रें । उंतळें विस्तीर्णें चित्रविचित्रें ।
कनकनाणी सीर्गमात्रें । समान दान होतसे ॥ ७८ ॥
कोठील ह्मणाल ठेंसील नाणीं । पुरातन हे तेजोखाणी ।
राया रामाची ठेवणी । अगत्य आजी उघडली ॥ ७९ ॥
सुंदरें आणी चोखटें । वावन्नकस लखलखाटें ।
कोरिलीं आणी घनवटें । वैकुंठ ठसा गाजला ॥ ८० ॥
घ्या घ्या द्या द्या हे चि घोश । कडक उठिला विशेंष ।
दान होतसे सावकाश । लाहान थोर न ह्मणती ॥ ८१ ॥
रत्नें माणिकें प्रवाळें । तेजोरासी मुक्ताफळें ।
कनकनाणी तेणें काळें । मिश्रित पात्रीं वांटिती ॥ ८२ ॥
नवरत्नाच्या जिनसा । कोण पुसे वावन्नकसा ।
त्रैलोकीं द्याकार नाही ऐसा । द्रव्य फुका लागलें ॥ ८३ ॥

---

१ नुपुर ह्मणजे तोरडी, पण येथे त्याचा काय अर्थ ? " नुपर " असा पाठ वाडात आहे, पण त्याचा तरी अर्थ काय ? कदाचित् काही अपुरें पडेल ह्मणून द्रव्यशक्ति स्वतः च सिद्ध होती, असा कांहीं अर्थ करावा. २ " वैकुंठ पळोनि आणिलें " पाठांतर. ३ उथळ ४ भरपूर भरून. ५ ठशाचीं. ६ " निरोप " पाठांतर

देव बेसविले ठिकाणीं । तेथें कनकरत्नाच्या खाणी ।
मां त्रिभुवननाथ च्यापपाणी । काय उणें द्रव्यासी ॥ ८४ ॥
येक मेरु माहा मेरु । दोघे राजे नामधारु ।
सूर्यवंशी विशेपाकारु । भाग्यें सीमा सांडिली ॥ ८५ ॥
ऋपी ब्राह्मण नेणों किती । लाहान थोरा नाहीं मिति[3] ।
कनकरासी समर्पिती । न्या न्या शब्द उठिले ॥ ८६ ॥
बावन्नकसा हि वरि[4] टिकें । पुतळ्या मोहरा सोनटके[5] ।
ब्राह्मणापुढें नेटके । ढीगे ढीग दाटले ॥ ८७ ॥
ब्राह्मण ह्मणती जि भूपति । पुरें द्रव्य न्यावें किती ।
अपेक्षेची जाली तृप्ती । न भूतो न भविष्यति ॥ ८८ ॥
धर्म ह्मणे माझी धणी[6] । पुरली नामाची आयणी[7] ।
मागें दान ऐसें कोण्ही । पुढें आतां करीना ॥ ८९ ॥
धर्म बोले अयोध्यापति । तुज कल्याण हो कल्याणमूर्ति ।
माझे वासनेची तृप्ती । तुझिया ध्याकारें जाली ॥ ९० ॥
ब्राह्मणा नाहीं तृप्तीदानें । जालीं आहेत भापणें ।
या ध्याकारें तीं वचनें । तृणतुछ केलीं ॥ ९१ ॥
थोर ध्याकार सर्वगुणें । द्रव्य वांटिले संख्येविणें ।
आश्रमा स्त्रिया ब्राह्मणें । कष्टीं कनक वाहाती ॥ ९२ ॥
किती मागती गजयानें । किती मागती अश्वयानें ।
आशीर्वादाचीं वचनें । आश्रमा पाठवा बोलती ॥ ९३ ॥
ब्राह्मणाचे आज्ञाधार । दोही दळींचे नृपवर ।
सेना देऊन अपार । द्रव्य आश्रमा पावविती ॥ ९४ ॥
दान नेतां जिकडे तिकडे । कनकमणीचे जाले सडे ।
हाट बाजार चहुंकडे । लखलखायमान ॥ ९५ ॥

---

१ "कनकमणीच्या" पाठांतर. २ मग. ३ याडांत "निती" आहे. मागील ९×६१ पहा. ४ "बर" पाठांतर. ५ सोन्याचें जुनें नाणें. ६ तृप्ती, इच्छा. ७ इच्छा(?) ८ ब्राह्मणांचा लौकिक पूर्वांपर चालत आला आहे ह्मणावयाचा!

ध्याकार जाला अपार । चकित पाहाती सुरवर ।
ह्मणती भांडारी कुबेर । तो चि जेथें अवतरला ॥ ९६ ॥

ज्याचे गांवीं पाहातां किती । चिंतामणीच्या इमारती ।
परिसखडे लोळती । कल्पतरूचीं उद्यानें ॥ ९७ ॥

रमा चंचळ ह्मणती भारी । परि अक्षई दशरथाचा घरीं ।
याकारणें सर्व प्रकारीं । अधिक ध्याकार बोलिला ॥९८॥

कनक नाणीं मिसळणी । परिस आणी चिंतामणी ।
याकारणें सर्व गुणी । थोर ध्याकार जाला ॥ ९९ ॥

ऐसा जाला तो ध्याकार । सकळां पूजा पुरस्कर ।
मग उठिला नृपवर । राजा अयोध्यापुरीचा ॥ १०० ॥

मिथिळेश्वरें परम लीनें । बोलोनि मानाचीं वचनें ।
वऱ्हाडी निघाले सन्मानें । कौसल्यादि चालिल्या ॥ १ ॥
तुरें लागलीं नेणों किती । भाट ब्रीदें वाखाणिती ।
माहासंभ्रमें भूपति । जानवसां पातला ॥ २ ॥
तव त्या जनकाचे मंदिरीं । कोदंडमूर्ति ते साजिरी ।
सुंदर शाम बंधु वरी । परम शोभता जाला ॥ ३ ॥
रत्नमणीचें तें भुवन । नेणों सुखाचें अधिष्ठान ।
रत्नदीप शोभायमान । दिव्यासनें लखलखिती ॥ ४ ॥
सीतेसहित सीतापति । खचितासनीं बंधु पंगति ।
बतिस वाट्या लखलखिती । रत्नताटें मांडिलीं ॥ ५ ॥
परमानंदें सुमेधेनें । शाका बोदनें पक्वान्नें ।
अति उत्तमें पायसान्नें । पंचामृतें वाढिलीं ॥ ६ ॥
रत्नपात्रीं विमळोदकें । सुवासें ठेविलीं जनकें ।
विनित उत्तरें मंगळिकें । काये बोलता जाला ॥ ७ ॥
ह्मणे स्वामी सर्वोत्तमा । तुझा दास मी पुरुषोत्तमा ।
वेळु जाला करीं क्षमा । आपुशन करावें ॥ ८ ॥

तव ते वधु सुलक्षणी । तुपें आपुशन ते क्षणीं ।
घालितसे पंकजपाणी । सुंदर करें कराग्रें ॥ ९ ॥
दिसे आपुशन साजिरें । पाहाती दोघे हि मनोहरें ।
मग त्या प्राणाहुति सुंदरें । रघुत्तमें घेतल्या ॥११०॥
बंधुसहित विराजमान । राजस राजसाचें भोजन ।
होतसे शोभायमान । जनकप्रार्थना ते काळीं ॥ ११ ॥
वाम भागीं शोभे सीता । दोघें सुंदरें पाहातां ।
रामप्रभा विशेषता । मंदिर तेजें डवरलें ॥ १२ ॥
रत्नमणीचे मंदिरीं पूर्ण । रामप्रभेचें फांकले कीर्ण ।
पदार्थ मणी लोपले वर्ण । राजा आश्चिर्यें दाटला ॥ १३ ॥
मग तृप्तीचें भोजन । जालें विळासें करून ।
शुधोदकें आचमन । बंधुसहित सारिलें ॥ १४ ॥
कर्पुरविडे उपचारें । राम पूजिले परिकारें ।
नीरांजनें तीं अपारें । पुष्पांजुळी वाइली ॥ १५ ॥
थोर देव रायाचें । हें दैवत वैकुंठीचें ।
इाता चढलें जनकाचें । कोण भाग्य पाहा हो ॥ १६ ॥
सकळ सुखाच्या सागरा । सर्व विश्रांतीच्या माहेरा ।
सुंदर वोळलां सीतावरा । नाना सोहळे जाणविती ॥ १७ ॥
ब्रह्मयाचे मानससुत । नारदादि गायनें गात ।
शुकादि योगी भक्त । सकळ सेवा जाणविती ॥ १८ ॥
पुढिले समासीं अक्षते । राजा आईल संभ्रमेंते ।
वेणी ह्मणे परिसा श्रोते । भोजन विधि प्रकारा ॥ ११९ ॥

इति श्रीरामायणे बाळकांडनिरूपणे सीतास्वैवरोनाम समास ॥११॥

---

१ अस्त गेलें.

## ॥ समास बारावा ॥



॥ श्रीरामकर्ता ॥

जनकराज संभ्रमेंसी । निघाले अक्षतेसी ।
राये राये ब्राह्मण ऋषी । समागमें चालिले ॥ १ ॥
सकळ रथीं दिव्ययानीं । सिबिका अमित सुवासिनी ।
मंगळ तुरांची[2] दाटली ध्वनि । जानवसां पातले ॥ २ ॥
राया दशरथाची सभा । सकळ सिधी सुलभा ।
जेथें वास सीतावल्लभा । तें काये ह्मणोनि वर्णावें ॥ ३ ॥
त्या सभामंडपामति । मिथिळ आला भूपति ।
थोर सन्मानें बरव्या रीति । वरासनीं बैसवी ॥ ४ ॥
ऋषी ब्राह्मणा भूपाळा । बैस बैसकार सोहळा ।
सुमेधे आदि सकळा । कौसल्यादि बैसल्या ॥ ५ ॥
तव त्या कुंकुम अक्षता । कनकताटीं विराजतां ।
ब्राह्मणकरीं शोभतां । राजा उभा बोलतु ॥ ६ ॥
ह्मणे आधीं अक्षत गणपति । तुह्मी घ्यावी पुरोहितीं ।
जनकरायें अतिप्रीति । वशिष्ठभाळीं लाविली ॥ ७ ॥
ऋषी ब्राह्मणा सन्मानें । अक्षत दिल्ही बहुमानें ।
मग रायासी वचनें लीनें । अति सुंदरें बोलतु ॥ ८ ॥
बहु प्रीतीचेन भरें । ह्मणे अक्षत घ्यावी नृपवरें ।
आपुल्या सकळपरिवारें । नैवेद्या आलें पाहिजे ॥ ९ ॥
ह्मणोनि अक्षत लावी भाळा । तैसी च दिधली सकळां ।
मग राजपूजा सोहळा । अति संभ्रमें मांडला ॥ १० ॥
राया दशरथाचे उपचार । रंगपूजेचा गजर ।
राये राय उठिले थोर । गंधाक्षत चालिली ॥ ११ ॥

---

१ " निघालासे " पाठांतर. २ " तुरांचा दाटला " पाठांतर.

टिळे केशर कस्तुरी । चोवे चंदन कुसरी ।
परिमळ धुशरें नानापरी । रंगसिंपणी रंगली ॥ १२ ॥
पुष्पमाळा वहुसाल । नाना परिमळ द्रव्य अमोल ।
कर्पूरमिश्रित तांबोल । लक्षानलक्ष वाटिती ॥ १३ ॥
रसमसें पूजेचा उभारा । रंग दाटलासे सैरा ।
राजवधु उपचारा । पूजा समस्तां जाली ॥ १४ ॥
नाच गायनें विळास । त्यांग पडिले बहुवस ।
मिथिळ बोले भूपतीस । आतां समर्थें चालावें ॥ १५ ॥
संभ्रमें चालिला नृपवर । दोही दळींचे माहावीर ।
छेत्रपति नामधार । राये राय उठिले ॥ १६ ॥
पुढें चालिले राजभार । रथ छेत्रें तें अपार ।
पताका झळकती सुंदर । यानें स्त्रियादिकांचीं ॥ १७ ॥
दोही दळींचा सोहळा । मंगळतुरांचा येकवळा ।
उभय भाग्य वैभव कळा । चढें चढें दाविती ॥ १८ ॥
रथाहूनि रथ चढे । गजाहूनि गज चढे ।
छत्राहूनि छत्र चढे । भाग्यें चढ दाविती ॥ १९ ॥
दोही दळींची थोराई । कोण संपदेची नवाई ।
मिथिळें संभ्रमें व्याही । आपुलया मंडपा आणिले ॥ २० ॥
सभामंडपीं वैसकार । सकळां जाला आदर ।
तव त्या स्नानाचा गजर । अद्भुत घोश दाटला ॥ २१ ॥
कनक लोहो हांडे गंगाळें । जळें तापलीं निर्मळें ।
कनक कुंडें विशाळें । उष्णोदकें तापलीं ॥ २२ ॥
सीतळोदकें सरोवरें । कनकपाटें येती नीरें ।
सीत उष्ण येकसरें । हेमकुंडीं मिळती ॥ २३ ॥

---

१ चोवा, क्वचित् चोहा, ह्मणजे सुगंध चंदन. २ (?). ३ विदागी. ४ "येक [illegible]ळ्या" पाठांतर. ५ " लोखा " पाठांतर (?) लोह ह्मणजे सोनें असा हि पण अर्थ आहे.

वृंदावनें कुसरी । रत्नमंडप त्यावरी ।
पुष्पवाटिका नानापरी । परम रमणीय स्थळ तें ॥ २४ ॥
पाचीसिळा जिकडे तिकडे । रत्नभूमी चहुंकडे ।
न्हाण्या वोटे वाग पुढें । मंडप वैसावयाचे ॥ २५ ॥
उत्तम देखोनिया स्थळा । ब्राह्मणी स्नानें केलीं सकळां ।
रायें सकळां सोहळा । पीतांवरें दिधलीं ॥ २६ ॥
जाली ब्राह्मणांचीं स्नानें । वशिष्ठादि वहुमानें ।
ऋषी तापसी सन्मानें । शुकादिकीं सारिलीं ॥ २७ ॥
जान्हवीतीर यमुनातीर । गंडकीतीर नर्वदातीर[1] ।
गौतमीतीर भीमातीर । कृष्णातिरीचे दाटले ॥ २८ ॥
सप्तसागरतीरवासी । गोमतीतिरीचे संभ्रमेंसीं ।
कावेरीतिरीचे जिनसी । मंडपीं ब्राह्मण गजगजिती ॥२९॥
देवस्थान जितुकें । तीर्थ मात्र तितुकें ।
भाषापरत्वें अनेकें । विद्यापात्रें गर्जलीं ॥ ३० ॥
संख्या न वोलवे वाचे । सप्त द्वीप द्वीपांतरीचे ।
स्नानें करून जनकाचे । मंडपीं ब्राह्मण दाटले[2] ॥ ३१ ॥
सकळांसी दिव्यासनें । आभरणें दिव्यवसनें ।
उदकपात्रें शोभायमानें । समस्तांचीं झळकती ॥ ३२ ॥
धडक दाटला वेदध्वनि । ऋग्वेद सामगायनी ।
येजुर्वेद आथर्वणी । स्वरकळा दावित्ती ॥ ३३ ॥
जितुके कांहीं तापसी मात्र । ईति[3] ब्रह्मच्यारी पवित्र ।
योगाभ्यासी जे विचित्र । गृहस्तीं स्नानें सारिलीं ॥ ३४ ॥
दिव्यावरें परिधान । दिव्य भूषणीं शोभायमान ।
इंद्रसभे देवजन । तैसे शोभते जाले ॥ ३५ ॥

१ बाडात " तमसातीर " असें प्रथम असून त्याचें " तर्सातीर " केलें आहे, पाठांतर. २ " दाटली " पाठांतर. ३ यति.

सभामंडपीं अलोलिक । राया राघवाचे लोक ।
सकळ हि मंगळदायक । पुण्यमूर्ति घवघविती ॥ ३६ ॥
वर वऱ्हाडी सन्मानें । समस्ती सारूनियां स्नानें ।
जनकप्रार्थनेची वचनें । रायें स्नान सारिलें ॥ ३७ ॥
जालें सन्मानाचें स्नान । दिव्यांबरें परिधान ।
कनकमंडपीं शोभायमान । दिव्यासनीं बैसविले ॥ ३८ ॥
दिव्यासनांची फाके दीप्ती । रत्नसमया पाजळती ।
अनुक्रमें सकळांप्रति । कितीयेकी ठेविल्या ॥ ३९ ॥
कनकमणीचे भुवनी । माता कौसल्या दिव्यासनीं ।
कैकै सुमित्रा आदिकरूनि । राजराण्या बैसल्या ॥ ४० ॥
रत्नमणीचे दीपथाट । रत्नआळंकाराचे लखलखाट ।
दिव्यांबरें मगमगाट । पाचि घोळली घमघमिती ॥ ४१ ॥
तव तें रत्नमणीचें वाहुलें । मुक्ताफळीं जें गुंफिलें ।
मुक्तचांदोवीं शोभलें । भांगारतेज लखलखी ॥ ४२ ॥
त्या वोहलां शोभायमान । मनमोहनी जगजीवन ।
पाहाती सकळ भक्तजन । ऋषी ब्राह्मण बोलती ॥ ४३ ॥
आदि अनादि पूर्वजा । सूर्यअस्तु हा समय वोजा ।
वेदभूपणा वरदराजा । उपासन करावें ॥ ४४ ॥
मैथळीसहित रघुवीर । जालें उपासन उपचार ।
अग्नीप्रदक्षणे वोहर । विश्व आनंदें पाहाती ॥ ४५ ॥
सुंदरें आणी सुलक्षणें । गुप्त गात्रीं नाना भूपणें ।
चरणीं वाजती रुणझुणें । पीतांबरवरणी ॥ ४६ ॥
जालें सांग उपासन । राजीवनयनी पंकजनयन ।
दोघे वोउला विराजमान । आरत्या करिती सुंदरा ॥४७॥
जयजयकारें तिन्ही लोक । वोहर पाहाती अलोलिक ।
सुंदर शाम रघुनायक । सीतेसहित विराजे ॥ ४८ ॥

१ "वोवलें" पाठांतर.

दिव्यासनी वधुवर । बोउला राम सुंदर ।
भक्तजन ते चकोर । सन्मुख पंगती वैसले ॥ ४९॥
रत्नदीप शोभायमान । शुभासनी भक्तजन ।
सुंदर मूर्ति पावन । भक्तमंडळी पाहातसे ॥ ५० ॥
रामपंगती कोण कोण । भक्त वैसले सुलक्षण ।
सकळ केलें रामार्पण । नामधार शोभले ॥ ५१ ॥
ब्रह्मा आणी उमापति । सुरेंसहित सुरपति ।
वेश धरूनि तेजोमूर्ति । रामपंगती वैसले ॥ ५२ ॥
व्यासादि कवेश्वर । शुकादि योगेश्वर ।
वशिष्ठादि ऋषेश्वर । कौशिक मुनी वैसले ॥ ५३ ॥
सबाह्य विमळ जीवन्मुक्त । ध्यानस्त योगी अभिमुक्त ।
तेजोरासी नित्यमुक्त । रामपंगती वैसले ॥ ५४ ॥
मानां स्थानीं ब्रह्मरूपी । देवरूपी राजरूपी ।
अठ्यासी सहस्र संभ्रमेसीं । शौनिकादि पंगती दाटले॥५५॥
वाल्मीक अत्रि भारद्वाज । वैष्णव नारद भक्तराज ।
ब्रह्मयाचे तेजपुंज । मानसपुत्र वैसले ॥ ५६ ॥
संत साधु आणी सज्जन । इति आणी तापसजन ।
विरक्त ते तपोधन । अपर सूर्य वैसले ॥ ५७ ॥
कित्येक काळाचे उपवासी । इछित होते पंगतीसी ।
ते पावले मनोरथासी । भूगर्भीचे आले ॥ ५८ ॥
पंगती गोमुख आणी मोनी। कदां भेटी नाहीं ज्या भोजनीं ।
जे सदांचे उपोषणी । वीतरागी हि वैसले ॥ ५९ ॥
अन्नव्रतधारी उदास । नेणेत जना अरण्यवास ।
अपार वैसले पंगतीस । तेजोरासी दाटले ॥ ६० ॥
किती वैसले अग्नीहोत्री । शास्त्रज्ञ जे माहाश्रोत्री।
परमहंस करपात्री । ब्रह्मच्यारी वैसले ॥ ६१ ॥

---

१ " पाथी " पाठांतर २ दुसरे ३ भुयारांतील

भक्तमंडळी तेजोरासी । भव्य बैसले पंगतीसी ।
जे नेणत परदैवतासी । सुचिम्मंत उपासक ॥ ६२ ॥
त्रैलोकींचीं सुखपात्रें । जें निवाली मूळ मंत्रें[1] ।
रघुनाथजींचीं प्रीतिपात्रें । पंगती भव्य दाटले ॥ ६३ ॥
थोर सोने भक्तजन । समस्त बैसले येऊन ।
नवैविधेचें[3] साधन । तेजोरासी दाटले ॥ ६४ ॥
देवें मुख्य भक्तराज । त्यांची मांडलीसे गजगज ।
ब्राह्मणमुखें तेजपुंज । स्वरें अक्षरें उचलिलीं ॥ ६५ ॥
त्या वेदाक्षराचे घोश । गंधक्षताचे विळास ।
मिथिळनाथें सावकाश । ब्राह्मणपूजा केली ॥ ६६ ॥
कुंकुमकेशरविलेपन । सुरंग अक्षता शोभायमान ।
सर्वांगी बावनचंदन । सुमनमाळा धुशेरें ॥ ६७ ॥
जनकरायें सावकाश । ब्राह्मण पूजिले विलास ।
भक्तमंडळी विशेष । अति प्रीति पूजिले ॥ ६८ ॥
पूजा जालियां सेवटीं । तारें चालर्ली कोटी च कोटी ।
वीस तीस बत्तीस वाटी । कनकमणीमंडितें ॥ ६९ ॥
जिकडे तिकडे अमिता । कनकमणी लखलखिता ।
परम सुंदर चळथा । चवर्डी तारें चालिलीं ॥ ७० ॥
रत्नदीप चहुंकडे । लखलखाट जिकडे तिकडे ।
ब्राह्मणमंत्राचे घोश गाढे । वाढा वाढा बोलती ॥ ७१ ॥
दिव्य भूषणें मंगळिका । चालिल्या अंगना अनेका ।
कनकपात्रीं लवण शाका । कुसिंबिरी वाढिती ॥ ७२ ॥
सेपें अंजिराचे गीर । खोबरें खारिकाचे चुर ।
लवण निंबु रुचिकर । मिरकुटें घोळिल्या ॥ ७३ ॥

---

१ "यंत्रें" पाठांतर. २ लहान. ३ नवविधा भक्तीचें. ४ "वेद" पाठांतर.
५ चळत, ढीग.

आक्रोट बदामाचीं चूर्णें । मिरें मिश्रित निंब लवणें ।
द्राक्षें खिरण्या त्याप्रमाणें । कुसिंविरी वाढिल्या ॥ ७४ ॥
गोडंग्या चारोळ्याच्या कुसरी । मुळें वाळकें कुसिंविरी ।
आलें निंबें रुचिकरी । दही आवळे नेलचटें ॥ ७५ ॥
लोणचीं वाढिती मगमगित । साखरनिंबें विराजत ।
आलें निंबें मिरवत । । ईडें पचले मीरघोस ॥ ७६ ॥
रांपली हळदि रसाळें । आंबे भोंकरें मायनमुळें ।
फांकड्या आणी सालफळें । नेपतीं मेकीं करवंदें ॥ ७७ ॥
हिरव्या लवंगा पीपळ्या घड । ईडें पचविला सुरण गोड ।
मग वाढिले पापड । तिळवड्या मिरगोडें ॥ ७८ ॥
राई आणीक सांडई । वाढूं नये ये समई ।
ह्मणोनि ते आणिली नाहीं । मंगळमंडपीं यालागीं ॥७९॥
घेवड्या नखोल्या गोराणी । चवळ्यासेंगा तळणी ।
कारली कढों चि मांडणी । वृंताकें तळली वाढिलीं ॥ ८० ॥
देवडांगरे कोहळीं । उत्तम रांधिली तोंडवळीं ।
दोडके आणी पडवळीं । कोंवळीं रांधिली वाळकें ॥ ८१ ॥
जितुक्या कांहीं फळशाका । नानापरीच्या मळेशाका ।
कितीयेक आरण्यशाका । तळण्यापरि वाढिल्या ॥ ८२ ॥
सांबारीं वाढिलीं जिनस जिनसें । दुग्धें मिश्रित बहुवसें ।
नाना परीचीं सुरसें । कोहळवडे आळणें ॥ ८३ ॥
सकळ शाका सेवटें । मेतकुटें नेलचटें ।
त्या खालती मिरकुटें । लवणें निंबें रसाळें ॥ ८४ ॥
दहिवडे द्राक्षवडे । नाना रुचीचे नाना वडे ।
त्यासेजारीं आंबवडे । अति कुसरी वाढिती ॥ ८५ ॥
सुवास वोदन मगमगीत । वाढूं लागल्या अमित ।
कनकवोगराळी नेमस्त । अणुमात्र चळेना ॥ ८६ ॥

सेवया घोटवे चिंचमोहर । सरोळी गहुले साखर ।
फुलें परड्या परिकार । दुग्धें आळल्या पायेसा ॥ ८७ ॥
मालत्या आणी नखोले । दुग्धें रांधिले फणोलें ।
पायेसा प्रकार वाढिले । ज्यांच्या खिरी शर्करा ॥ ८८ ॥
साखरमांडे दुधमांडे । खसखसमांडे तीळमांडे ।
तांदुळमांडे पूर्णमांडे । पूर्णगर्भा वाढिल्या ॥ ८९ ॥
वळपुऱ्या सांजोऱ्या । घाऱ्या आणी तेलऱ्या ।
कोरवडे गुळवऱ्या । सकळांवरी शोभती ॥ ९० ॥
माठघवणें सोजी फेण्या । प्रकार लाडु साखरफेण्या ।
सवळ समोसे कोडिसवाण्या । वरि वत्तासा वाढिल्या ॥९१
नाना पक्वान्नें पवित्रें । नानापरीचीं विचित्रें ।
सुवासें घृतें भरिलीं पात्रें । सकळां सांग वाढिलें ॥ ९२ ॥
शुध शुभ्र शर्करा । साय मधु वाढिला सौरा[१] ।
दुग्ध दधी अपारा । वाढित पुढें चालिल्या ॥ ९३ ॥
तुपें वाढितां लागवेग । पात्रें भरून जाती वोघ ।
केळें सिखरणी येथासांग । नाना रस वाढिले ॥ ९४ ॥
अति विनित होऊन । जनक प्रार्थी कर जोडून ।
ह्मणे श्रीमंत आपुशन । समर्थें केलें पाहिजे ॥ ९५ ॥
तो ते जनकाची वाळी । आज्य घेऊन पंच्यांगुळी ।
आपुशन ते विन्हळी[३] । वरदराजा घातलें ॥ ९६ ॥
समस्तीं केलीं आपोशनें । प्राणाहुति घेती बहुमानें ।
मग सकळांचीं भोजनें । अति संभ्रमें मांडली ॥ ९७ ॥
नाना परीचीं पक्वान्नें । जेविती रसाळें मिष्टान्नें ।
पात्रीं भरलीं दिव्यान्नें । आणी कितेक वाढिती ॥ ९८ ॥
साय सिखरणी शर्करा । नाना रसा परिकारा ।
वळें चि घृत वोतिती सौरा[२] । सारणी होत जातसे ॥ ९९ ॥

---

१ "शुभ्र मांडे" पाठांतर. २ "सैरा" पाठांतर. ३ "वेल्हाळी" पाठांतर.

नाना पकान्नें परिकार । परवडी वाढिती अपार ।
ब्राह्मणआग्रहाचे गजर । नेयों नेयों उठिले ॥ १०० ॥
कथिका वाढिती सुवास । ब्राह्मण घेती सावकाश ।
जोडा नाहीं जेवणास । नामघोषें गर्जती ॥ १ ॥
सुवर्णकळसीं सुवास जळें । गौतमीजान्हवीचीं निर्मळें ।
लक्षानलक्ष तेणें काळें । घ्या घ्या ह्मणोनि फिरती ॥ २ ॥
उदकें घेती अपार । किती वानिती सुंदर ।
थोर जेवण उपचार । न भूतो न भविष्यति ॥ ३ ॥
पात्रीं भरल्या परवडी । दधी वोदन वाढावाढीं ।
रस मिठीची जिवडी । तक्रें सुंदरें घेताती ॥ ४ ॥
नामघोशाचा गजर । ध्वनि दाटलें अंबर ।
सकळा पंगती विश्वंभर । राम शोभें शोभले ॥ ५ ॥
सीतेसहित सीतापति । ते भक्तराज पंगती ।
समस्तांच्या चित्तोवृत्ति । रामरूपें मोहिल्या ॥ ६ ॥
दृष्टीनें घेतली तन्मयता । चित्त पावलें तद्रूपता ।
स्मरेना जेवण जेवितां । स्वानंदघन पाहाती ॥ ७ ॥
येका हातींचे गळाले घांस । भक्त ज्ञानी रामरूपास ।
लोधले तो सुखविलास । वाचे केवि वोलवे ॥ ८ ॥
साधनें साधूनि साध्य स्थिति । तृप्त रसें सकळां तृप्ती ।
सुंदरश्यामाचे पंगती । सुंदर भक्त विराजले ॥ ९ ॥
रामपंगतिविलासें । सकळां तृप्ती तृप्तरसें ।
चिंतित होतीं मानसें । सिधी पावली सर्वांची ॥ ११० ॥
जे तृप्तीचें तृप्तपण । त्याचें जालें जेवण ।
शुधोदकें आच्मन । शुधरूपाचें जालें ॥ ११ ॥
समस्त पंगति येकवळा । जाली आच्मनें खळाळां ।
सुखशुधीचा सोहळा । थोर गजवज दाटला ॥ १२ ॥

---

१ प्रकार. २ (?) आवडी. ३ साखर.

कनकमंडप रत्नखचित । शुक्त चांदोवीं विराजत ।
दिव्यासनीं सीताकांत । सीतेसहित शोभला ॥ १३ ॥
नाना भूषणीं विराजमान । मैथळीसी रघुनंदन ।
देव्हडी[1] चामरें भक्तजन । उभे दुभागीं दाटले ॥ १४ ॥
विजणे वारिती कितीयेक । विडिया देती सनकादिक ।
पीकपात्री सुरनायेक । समीप बंधु शोभले ॥ १५ ॥
कश्यपादि ऋपेश्वर[2] । व्यासादि मुनिवर ।
ब्राह्मण तापसी अपार । संत सिध दाटले ॥ १६ ॥
मानसुखानें सकळांसीं । राव राजे प्रधानासीं ।
दोही दळीचे संभ्रमेसीं । अपार जन दाटले ॥ १७ ॥
सभा घनवटलीसे घनदाट । दिव्यांबराचे तगतगाट ।
आळंकाराचे लखलखाट । वर वऱ्हाडी बैसले ॥ १८ ॥
सभामंडप तेजोरूप । ठाईं ठाईं लोंवती गोफ ।
रत्नतार्टी रत्नदीप । परम शोभायमान ॥ १९ ॥
मग ते पूजा सकळां । सुगंध आणी सुमनमाळा ।
परिमळ धुशरें सोहळा । असंख्य पात्रें फिरती ॥ १२० ॥
पूजा जाली परिकारें । तांबोल वाटले उपचारें ।
मग दक्षणेस भांडारें । अपार द्रव्य लोटलें ॥ २१ ॥
दक्षणा वाटली संख्येविण । तृप्त जाले ऋपी ब्राह्मण ।
मंत्राक्षता सुलक्षण । येथासांग विधी जाला ॥ २२ ॥
याचिपरी तीन दिवस । सांग जाले सावकाश ।
आजी चतुर्थीविळास । निरवणसंभ्रम मांडला ॥ २३ ॥
आतां पुढिलिये समासीं । राजा निरवील जानकीसी ।
वेणी ह्मणे श्रोतयासी । साडेसंभ्रम आईका ॥ १२४ ॥

इति श्रीरामायणे । आदिकांडे । सीतास्वैवरो नाम । समास ॥ १२ ॥

---

[1] "देवढी" पाठांतर. [2] "मुनेश्वर" पाठांतर.

# ॥ समास तेरावा ॥ १३ ॥

॥ श्रीरामकर्ता ॥

तव वशिष्ठादि ब्राह्मण ऋषी । समस्त बोलती रायासी ।
साडे आतां जानकीसी । समर्पिले पाहिजे ॥ १ ॥
अगाध दशरथाचें वैभव । ते वस्त्राची वरव ।
रायें रायें अभिनव । देव आश्चिर्ये दाटले ॥ २ ॥
चित्र विचित्र कनकाची । सप्त खंडें अमरावतीची ।
आणी ठेवणी वैकुंठीची । निवडकें आणिली ॥ ३ ॥
ब्राह्मणाच्या मंत्रध्वनि । राजा पूजी जनकनंदनी ।
जानकी साडे वाउनी । सांग भूषणें वाइली ॥ ४ ॥
किंचित कपोळीं कस्तुरी । चंदन लाविलें कुसरी ।
परिमळ धुशेर सुंदरी । पुष्पमाळा घातल्या ॥ ५ ॥
तव ते आंहिर्णीचा समय । त्या विस्ताराचें आश्चिर्य ।
कनकमय रत्नमय । पात्रें सुतें लखलखीत ॥ ६ ॥
आतां आंदण विस्तार । तो सांगतां अपार ।
ज्यास देखोन सुरवर । मुनि चकीत जाले ॥ ७ ॥
तों त्या जनकाची पूजा । वेदध्वनीचा गजगजा ।
नाना उपचारीं रघुराजा । सुलीन दशे पूजितसे ॥ ८ ॥
भुवनसुंदर पदांबुज । नमस्कारिलें तेजपुंज ।
देवाधिदेव रघुराज । राजा पूजिता जाला ॥ ९ ॥
वस्त्रें वोंहतसे ते क्षणीं । नेणों उघडिली तेजोखाणी ।
जांबुनदाची सुवर्णी । रघुनाथजिकारणें ॥ १० ॥
मस्तकीं लपेटिलें विराज । दिव्य पट मंगळराज ।
जयावरून सर्व तेज । वोवाळून टाकिलें ॥ ११ ॥

---

१ एरिणीचा, वशापानदानाचा. २ " घातसे " पाठांतर

मुक्तरत्नाचे त्यावरी । झुबके तेजाच्या लहरी ।
लोटताती वरिच्या वरी । विश्व हेलावे भासे ॥ १२ ॥
कर्णी कुंडलें तेजोरासी । रायें घातली संभ्रमेंसी ।
रत्नचुणी जिनस जिनसी । त्याच्या कीळा फांकती ॥१३॥
त्या कीळांचे थाट । गंडस्थळीं लखलखाट ।
मुख निमासुर वरवंट । आतिशयेंसी शोभलें ॥ १४ ॥
सर्व तेजाचे येकवळे । पिळून दिधली येकसळें ।
तो पीतांबर दुर्वादळें । तनु सुंदर शोभली ॥ १५ ॥
कटीं मेखळा वरवंटा । किंकिणी आणी क्षुद्र घंटा ।
चित्रविचित्र लखलखाटा । मेखळेसेजारी दाटल्या ॥ १६ ॥
आजांनवाहो सुलक्षणां । वाहुदंडीं विभूषणा ।
रायें भूषणाच्या भूषणा । नानापरी लेवविलें ॥ १७ ॥
अनर्घ्य रत्नाचे हार । पदकमाळा मनोहर ।
वीरकंकणें सुंदर । पोवचि मुद्रिका शोभल्या ॥ १८ ॥
सुंदर शुध निरोपमा । लखलखाटें सांडिली सीमा ।
राजवसनें रघोत्तमा । येथासांग वाइलीं ॥ १९ ॥
कटमदेसीं कटवंदातें । अनर्घ्य रत्नें जडिलीं मुक्तें ।
ज्याच्या बरवेपणा उपमेतें । तृणतुच्छ केलें ॥ २० ॥
वसनें वाइलीं सुंदरासी । राजा पाहे पाउलांसीं ।
आंदु वाकी नेपुरेंसी । पदीं पूजा वाइली ॥ २१ ॥
सुंदर भूषणें मनोरमा । सांग वाइलीं रघोत्तमा ।
दिव्य भूषणें पुरुषोत्तमा । पाहिजे पदार्थ वाइला ॥ २२ ॥
हे चतुर्थीची पूजा । संभ्रमें करी राजा ।
नाना विळासी कौसल्यात्मजा । सर्व आवडी पूजितसे ॥२३॥

---

१ भरलेलें, सुंदर. २ मनोहर. ३ " दिल्हें घोपसळें " पाठांतर. ओपसरा= मुलामा.—४ आजानुबाहु. ५ " निरोपमा " पाठांतर. ६ " वसनें " पाठांतर. ७ " सप्रेमें " पाठांतर.

रसाळ भाळीं विलेपन । सुरंग अक्षता शोभायमान ।
कुसरी लाविलें चंदन । परिमळ धुशरीं पूजिलें ॥ २४ ॥
उत्तमा आणी विमळा । आपादपर्यंत सुमनमाळा ।
रायें घातलियां गळां । मदनमूर्ति शोभल्या ॥ २५ ॥
अमरीं पुसावीं ज्याचीं अंगें । तो हा राम लीळारंगें ।
तिन्ही लोक त्या प्रसंगें । पूजा पाहोनि निवाले ॥ २६ ॥
जनकआवडीचा नवलाव । पूजा केली अभिनव ।
सर्व सामर्थ्यगौरव । रघुनाथजि अर्पिलें ॥ २७ ॥
नाना उपचार पूजा । आवडी जनकराजा ।
पूजा केली वरऱ्या वोजां । अति संभ्रमें ते काळीं ॥ २८ ॥
सांग पूजिले बंधुजन । सौमित्रादि शोभायमान ।
वशिष्ठराजा सन्मान । शुभ गौरव पावले ॥ २९ ॥
कनकवस्त्रें तेजोरासी । मुक्तें गुंफिलीं सकळांसी ।
ढीग पडिले जिनस जिनसी । इच्छेहूनि आगळे ॥ ३० ॥
घड्या घड्या जिनसवार । किती उकलिती अपार ।
कनकमय उपचार । समस्तां वाढिते जाले ॥ ३१ ॥
राजआज्ञा अलोलिका । वस्त्रें देतां पुसों नका ।
येथासांग सकळिकां । लाहान थोर न ह्मणावें ॥ ३२ ॥
कोटी च कोटी फिरती वीर । मंगळवचनाचे उपचार ।
बहुमानें पुरस्कार । ऋषी ब्राह्मण गौरवी ॥ ३३ ॥
संत महंत साधुजन । इति तापसी आदिकरून ।
योगी सिद्ध तपोधन । समस्तां गौरव पावलें ॥ ३४ ॥
कोण उपचाराची ठेव । राया आवडी अभिनव ।
गौरव विस्तार लाघव । त्रैलोक्य आश्चिर्यें दाटलें ॥ ३५ ॥

---

१ देवार्ना. २ "पूजावीं" पाठांतर. ३ या चरणाऐवजीं "तो जनका लाधला भाग्ययोगें" असा पाठ वाडांत. ४ दुसऱ्या चरणाऐवजीं "सांग अर्पिली रघुराजा" व तिसऱ्याऐवजीं "मन वाहलें पादांबुजा" अशी चरणें वाडांत आहेत. ५ "उचार" पाठांतर.

तो राजा मिथिळेश्वर । अयोध्यापति उपचार ।
देऊनिया लहान थोर । पृथ्वीराजे गौरविले ॥ ३६ ॥
रायासहित वऱ्हाडी । गौरव-आभरणपरवडी ।
रायें दिधलीं चढोवेंडी । अमोल्य मोला आगळीं ॥ ३७ ॥
मंडपीं आळंकाराच्या रासी । जड जडाव समस्तांसी ।
हार पदकें सकळांसी । नाना भूषणें दिधलीं ॥ ३८ ॥
अनर्घ्य भूषणें अपार । राया समर्पी मिथिळेश्वर ।
साडेपूजा उपचार । वर वऱ्हाडी पावलें ॥ ३९ ॥
जनकरायें सन्मानें । कौसल्या गौरविली बहुमानें ।
कनकमय वसनें । मुक्ताफळांचीं चाइली ॥ ४० ॥
आणी जडित भांडारें । उत्तम समर्पिलें अपार ।
याचिपरी उपचार । राजराण्या पावल्या ॥ ४१ ॥
तों ते आहिर्णीचें आश्चिर्य । थोर विस्ताराचें सौंदर्य ।
सुमेधेसीं नृपवर्य । ब्राह्मणमंत्रीं शोभेली ॥ ४२ ॥
वंशपात्र आमोलिक । आंत रत्नाचे दीपक ।
पूजा करूनि जनक । सुमेधेसहित ते काळीं ॥ ४३ ॥
ब्राह्मणमंत्रीं वरव्या रीति । जानकी आहिर्णी निरविती ।
आशीर्वचनें बोलती । नेत्रोदक जातसे ॥ ४४ ॥
ब्राह्मणाची शुभासनें । तें चि सुमेधा बोले सुवचनें ।
ह्मणे गे गुणवंती तुजकारणें । हे आहिर्णी दिधली ॥४५॥
जानकी रमा सुलक्षणी । कनकमणीची आहिर्णी ।
निरवणेचीं बोलणीं । दंपत्यें गहिवरें दाटलीं ॥ ४६ ॥
विध जाला येथासांग । जनका गहिवर लगबग ।
ब्राह्मण ह्मणती हा प्रसंग । राया कन्या निरवावी ॥४७॥
जानकी आहिर्णी निरवितां । दोघां दंपत्यां खेद चित्ता ।
अवनिजा स्नेह करितां । नेत्रां जळ जातसे ॥ ४८ ॥

---

१ "चढोचढी" पाठांतर. २ "भांगार" पाठांतर. ३ "पूजिली" पाठांतर.

ब्राह्मणाच्या मंत्रध्वनि । सकळ गोताची दाटणी ।
मंगळतुरें ते क्षणीं । समस्त लीनें जालीं ॥ ४९ ॥
सूर्यवंशीं विराजमान । सभा घनवटलीसे गहन ।
जाला विध शोभायमान । ब्राह्मणमंत्रीं तो जाला ॥५०॥
करीं दुहिता मिथिळापति । जानकी निरवी भूपति ।
कन्यास्नेहाची थोर प्रीति । नेत्रोदक चालिलें ॥ ५१ ॥
कनकपुतळी धरूनि हातीं । राजा निरवी अयोध्यापति ।
ते समई गोत संपत्ति । सभेसहित गहिवरें ॥ ५२ ॥
जानकीगुणें हृदय कृपण । राजा निरवितां उच्चारण ।
[1]अष्ट वर्षे केलें म्यां पाळण । आतां तुह्मी करावें ॥ ५३ ॥
माझ्या प्राणाची प्राणकळा । सुखदायका सुसीळा ।
परम स्नेहें भूपाळा । ईचें पाळण करावें ॥ ५४ ॥
सकळ कीर्तीची गजगजा । निरोपम्य हे अवनिजा ।
ईचें पाळण रायें वोजा । बहु प्रकारें करावें ॥ ५५ ॥
परम स्नेहें मिथिळापति । दुहिता निरविली अयोध्यापति ।
कन्यास्नेहाची थोर प्रीति । नेत्रोदक जातसें ॥ ५६ ॥
कौसल्ये निरवी जनकबाळा । जळ वाहे नेत्रांजळा ।
ह्मणे माझी हे सुसीळा । पाळण तुह्मी करावें ॥ ५७ ॥
हे माझी सकळ संपत्ति । मज ईकरितां येशकीर्ति ।
कन्या माझी गुणवंती । परम स्नेहें पाळावी ॥ ५८ ॥
जानकी सुरतरोपमा[2] । हे हि कठीण उपमा ।
कन्या माझी निरोपमा । अर्भकापरी पाळावी ॥ ५९ ॥
माझ्या प्राणाची आवडती । जीवनकळा हे सुमति ।
ईचें पाळण बरव्या रीति । वडिलीं केलें पाहिजे ॥ ६० ॥
राजकांता अनुक्रमें । करुणाउत्तरें उत्तमें ।
मग रघुनाथजि संभ्रमें । जनक कन्या निरवी ॥ ६१ ॥

---

१ अष्टवर्षा त्वियं कन्या पुत्रवत्पालिता मया । इदानीं तव पुत्राय दत्ता स्नेहेन पाल्यताम् ॥. २ "सुंदर सुतोपमा" पाठांतर.

राम अंकावरी बाळी । रायें बैसविली मैथळी ।
देव दुंदुभी ते काळीं । समस्त तुरें लागलीं ॥ ६२ ॥
जानकी निरविली रामास । राजा जाला उदास ।
सर्वसंग त्या समयास । रघुनाथार्पण केला ॥ ६३ ॥
परोगतीचें आंदण । लक्ष्मी केली रामार्पण ।
जाली संभ्रमें निरवण । जयजयकार दाटला ॥ ६४ ॥
तव तो श्रींगारिला[1] चौदंती । छत्रें पताका झळकती ।
तयारूढ ते गुणवंती । ब्राह्मणा वायनें देतसे ॥ ६५ ॥
दोहीं दळींचीं वायनें । वांशपात्रें दिव्यायमानें ।
भरलीं नाना मुक्त रत्नानें । विधियुक्त दाटलीं ॥ ६६ ॥
सहज रमा ते जनकात्मजा । जे त्रैलोक्याची गजगजा ।
वायनें देतां ऋपी द्विजा । आशीर्वादीं पूजिती ॥ ६७ ॥
वौंशवायनांचा गजर । ब्राह्मणमंत्राचे उच्चार ।
श्री मंगळा ते सुंदर । त्रैलोक्य वायनां दाटलें ॥ ६८ ॥
दोहीं दळींचे पुरोहित । व्यासशुकादि श्रीमंत ।
संत साधु अमित । सुरेसी वायनें घेतलीं ॥ ६९ ॥
श्रोतीं घेतली आशंका । संत निस्पृही वायनें कां ।
तरि निसंग सर्वत्यागी लोका । पतिग्रेह[3] नाहीं ॥ ७० ॥
कृपा शांति प्रसन्नता । अक्रोध वैराग्य ऐशी सीता ।
हें तों पाहिजे संता । सुमति ते जानकी ॥ ७१ ॥
केवळ विश्रांतीचें रूप । तें हि सीतेचें स्वरूप ।
शब्दा आले हेत रूप । तें स्वरूप जानकी ॥ ७२ ॥
संत ह्मणिजे निरंजन । हे हि जानकी प्रसन्न ।
तिचे हे आवडते जन । ह्मणोनि वायनें दिधलीं ॥ ७३ ॥
शेषासहित तळींचे जन । दिशा दिग्पति आदिकरून ।
नक्षत्रेंसी शोभायमान । चंद्रसूर्या दिधलीं ॥ ७४ ॥

---

१ "सिणघारिला" पाठांतर=शृंगारिला. २ हत्ती. ३ प्रतिग्रह.

ायनें घेतां संतुष्ट चित्तें । आशीर्वादीं पूजिती सीते ।
उमसन्न विश्वमाते । अक्षई सौभाग्य हें तुझें ॥ ७५ ॥
शिववधु विधिजाया । सुरेंद्रपत्नी अनुसया ।
वशिष्ठभाजा देवस्त्रिया । समस्तांसीं दिधलीं ॥ ७६ ॥
त्रिभुवनस्वामीचे वधूनें । वाटिलीं त्रैलोक्या वायनें ।
समस्तांचीं तृप्त मनें । येथासांग विध जाला ॥ ७७ ॥
पुढें वरात लक्ष्मीपूजन । भार्गवगर्वनिर्शन ।
वेणीस्वामी रघुनंदन । संभ्रमें जाती अयोधे ॥ ७८ ॥
इति श्री रामायणे । आदिकांडे सीतासैंवर । समास ॥ १३ ॥ ७॥



## ॥ समास चवदावा ॥ १४ ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

दोहीं दळींचीं मंगळतुरें । वरात चालिली गजभारें ॥
चवरडोली चंद्राकारें । छेत्रें पताका झळकती ॥ १ ॥
गजढालाचें आश्चिर्य । लखलखाट कनकमय ।
वरि वसनें मुक्तमय । रत्नाभरणें झळकती ॥ २ ॥
गजघांट कनकाचे । अंदु गोंवाई हेमाचे ।
वरि हिलाल रत्नाचे । हें आंदण निघालें ॥ ३ ॥
गज डुल्लती मदोन्मत्त । अंकुशपाणी आवरित ।
कि त्यावरून वाजत । दमामे कर्णे नफेऱ्या ॥ ४ ॥
तया पाठीसी उंट । कनकमय लखलखाट ।
नाना वाद्यांचे दणदणाट । तयावरून वाजती ॥ ५ ॥
तया पाठीसीं आंदण । वाजी निघाले संख्येविण ।
कनकमणी आभरण । पाखंरा खुमासी. झळकती ॥ ६ ॥

---

१ (?) गुंफलेले. २ पाखर=घोड्याच्या पाठीवर घालावयाची झालर.

ते हिसाटाचे गजर । मुखीं मद गळाले अपार ।
वारि वऱ्हाडी माहावीर । आटोपिती ते काळीं ॥ ७॥
तया पाठीसी रथथाट । कनकमणी लखलखाट ।
रत्नमय ध्वज अफाट । हें आंदण निघालें ॥ ८ ॥
तयामध्यें तेजोरासी । कनकमय रत्नें जिनसी ।
जयाच्या वरवेपणासी । सुरवर चकित जाले ॥ ९ ॥
चित्रविचित्र मणीघोश । मुक्तमाळाचे प्रकाश ।
जनकप्रीतीचा सारांश । रथरूप वोतला ॥ १० ॥
च्यारि वारु निरोपमा । सुंदरपणें सांडिलीं सीमा ।
भूषणमंडित उत्तमा । रथीं शोभते जाले ॥ ११ ॥
ते रथीं सिंहासन । लखलखी दिव्यायमान ।
मैथळीसी रघुनंदन । परम शोभता जाला ॥ १२ ॥
छेत्रें त्राहाटलीं वरि विस्तीर्ण । चंद्राकारें शुद्धवर्ण ।
रत्नकळसाचे कीर्ण । दशदिशा ढवळती ॥ १३ ॥
कनकदंड ते सुंदर । वरि मोत्यांचे झल्लर ।
घोश लोंबती अपार । मुक्तमणी रत्नाचे ॥ १४ ॥
वरि दाटल्या पताका । कनकदंडा लखाका ।
रत्नकळस सकळिका । मुक्तझुबके झमकती ॥ १५ ॥
लखलखिती निशाणें । तेजोरासी सूर्यापानें ।
माहिमुखें शोभायमानें । मछपुछें तळपती ॥ १६ ॥
कनकदंड शोभायमान । करीं घेऊन भक्तजन ।
दिव्य चामरें रथावरून । कितीयेक ढाळिती ॥ १७ ॥
कळाप्रविण बुधिमंत । रथीं सारथी सुमंत ।
परमानंदें भरित । माहा चतुर बैसला ॥ १८ ॥
ते रथीं मदनमूर्ति । वामांकीं रत्नदीप्ती ।
सीतेसहित सीतापति । परम शोभता जाला ॥ १९ ॥

---

१ "वरि" पाठांतर-

सनत्कुमार सनातन । दुभागीं चामरें येऊन ।
पीकपात्रें धरून । येक विडिया देतसे ॥ २० ॥
रामदक्षणभागीं वंधुराज । छेत्रें पताका तेजपुंज ।
दिव्य रथीं मंगळराज । परम शोभते जाले ॥ २१ ॥
वशिष्ठादि ऋपेश्वर । शुकादि मुनिवर ।
ब्राह्मण तापस अपार । रथमंडित चालिले ॥ २२ ॥
विश्वामित्र वाल्मीक । व्यास आणी शौनिक ।
रथमंडित भक्त अनेक । नारदादिक चालिले ॥ २३ ॥
ब्रह्मच्यारी योगाभ्यासी । कवि हरि नववंधुसी ।
दिव्य रथीं संभ्रमेंसीं । भामा[१] वेष्टित चालिले ॥ २४ ॥
दिव्य पताका आणी छत्रें । नेणों जैसीं मार्तंडपत्रें ।
सकळ रथीं विचित्रें । तेजोरासी झळकती ॥ २५ ॥
तव राजभाराचे पेलावे । थोर रथाचीं बरवें ।
अमरेश्वराचीं वैभवें । तृणतुछ त्यापुढें ॥ २६ ॥
दिव्य छेत्रें सूर्यापानें । पताका आणी निशाणें ।
माहिमुखें शोभायमानें । मछपुछें तळपती ॥ २७ ॥
मंत्री आणी पृथ्वीपति । दिव्य रथीं विराजती ।
छेत्रें पताका झळकती । वैभवें वऱ्हाडी चालिले ॥ २८ ॥
रथ रथाची दाटणी । छत्रें छत्रासी खेटणी ।
वाजी वाजी उफाळणी । कुशळ सारथी आवरिती ॥२९॥
तयामागें सिबिका । दोहीं दळीच्या अनेका ।
कौसल्यादि सकळिका । राजराण्या निघाल्या ॥ ३० ॥
छेत्रें पताका निशाणें । पायघडिया मुक्तासनें ।
बहु सोहळा बहुमानें । मुक्ताफळाच्या श्रींगीरी[३] ॥ ३१ ॥
तया मागें हि वऱ्हाड । वस्तु चालिली जाड जाड ।
राया जनका मनीं कोड । तें तें आंदण चालविलें ॥ ३२ ॥

---

१ कविर्हरिरंतरिक्ष इत्यादि नव बंधु. मागील ३ × ८२ पहा. २ "राम" पाठांतर. ३ शृंगार, का रासी ?

मुक्तें माणिकें रत्नमणी । अनर्घ्य भांडारें तेजोखाणी ।
अपार चालिल्या ते क्षणीं । संदूक पेट्या मांदुसा ॥ ३३ ॥
की त्या काळाची होती येत्नें । हिरे माणिकें अनर्घ्य रत्नें ।
रघुनाथजिकारणें । संचितार्थ केला होता ॥ ३४ ॥
बावन्नकसी संखेविण । कनक निघालें आंदण ।
रायें रघुनाथजिकारणें । भांडारें भांडार चालविलें ॥३५ ॥
रूपें प्रवाळ जिनसा । संचिताचा ठेवा जैसा ।
रायें जनकजे सरिसा । रामा आंदण चालविलें ॥ ३६ ॥
काय वर्णावें कवेश्वरें । धनसंख्या वाचा फिरे ।
चतुरंग वहनें अपारें । द्रव्य त्यावरी चालिलें ॥ ३७ ॥
पेट्यानपेटी आळंकार । जिनसमात्र भांगार ।
वस्तु चालिली अपार । कनकपात्रें निघालीं ॥ ३८ ॥
कनकगंगाळें निघालीं । लोह्या हांडे तपेलीं ।
चरव्या घागरी आणी झाली । हारे डेरे रत्नाचे ॥ ३९ ॥
असंख्य तीं कनकपात्रें । जिनस जिनसी विचित्रें ।
तस्तें तवकें पीकपात्रें । राजोपचार चालिले ॥ ४० ॥
उदकपात्रें बावन्नकसें । रत्नताटें जिनस जिनसें ।
कनकमणीचीं बहुवसें । सिंहासनें चौकिया ॥ ४१ ॥
खचित मंचक संख्येविणें । पांसाविलें मृदासनें ।
चामरें ढळती त्यावरून । हें आंदण चालिलें ॥ ४२ ॥
कनकमणीचीं वसनें । सांटी चालिल्या संख्येविणें ।
जनकें रघुनाथजिकारणें । सांटा ठेविली होतीं ॥ ४३ ॥
वैसावयाचीं अमित । दिव्यासनें लखलखीत ।
लक्ष्मी शोभा मूर्तिमंत । हें आंदण चालिलें ॥ ४४ ॥
केशर कस्तुरी चंदन । फुलेल निघालें शोभायमान ।
परिमळ धुदारें भरून । कोठ्या आंदण चालिल्या ॥ ४५ ॥

१ "कारणें येत्नें" पाठांतर. २ विणलेलीं (?).

केणें आंदण वरवंटीं । कोठ्या चालिल्या कोटी च कोटी।
मेवेफळाची दाटी । असंख्य पेटारे चालिले ॥ ४६ ॥
वछेंसहित थाटें । कामधेनूचीं अचाटें ।
वस्त्रें आळंकारें लखलखाटें । असंभाव्य चालिलीं ॥ ४७॥
मंगळतुरांचे पुढें घोश । दमामे कर्णे बहुवस ।
नाना वाद्यें तीं सुरस । पुढें आंदण चालिलें ॥ ४८ ॥
सेना दणदणिली अपार । कनकमय रत्नाकार ।
रघुनाथजीपुढें सुंदर । आंदण चत्वार चालिलें ॥ ४९ ॥
कनकमणीचे अचाट । अमित चालिले हिलालथाट ।
नाना दीपाचे लखलखाट । हें आंदण चालिलें ॥ ५० ॥
जनकें भाग्याचें आंदण । केलें रघुनाथजिकारण ।
संभ्रमाची मिरवण । त्रैलोक्य पाहों ठाकलें ॥ ५१ ॥
ज्या नादें रोम थरारी । ऐशा किती लागल्या भेरी ।
सुंदरें तुरें नाना परि । कितीयेक वाजती ॥ ५२ ॥
जिकडे तिकडे भरभराट । ऐशचे हवायाचे नेट ।
ते समई किंकाट । वाजी वारण आवरिती ॥ ५३ ॥
विस्तीर्ण पात्रें नेणों किती । जिकडे तिकडे चंद्रजोति ।
माहा संभ्रमें सीतापति । विश्व पाहे ते काळीं ॥ ५४ ॥
मिरवतां सीतावर । थोरा संभ्रमें मिथिळेश्वर ।
रथापुढें वेत्रधार । होऊनियां चालत ॥ ५५ ॥
रायाचे जे आवशक । वेत्रधारी कितीयेक ।
मध्यें फिरती अनेक । दाटी दुभागीं वारिती ॥ ५६ ॥
पायघडियाचे सन्मान । मुक्त वसनें दिव्यायमान ।
रामरथ त्यावरून । थीर थीर जातसे ॥ ५७ ॥

---

१ "वाद्याचे" पाठांतर. २ "सुरस" पाठांतर. ३ "औशध" पाठांतर. हा शब्द मागें हि आला आहे. ६×७६ व ८×८७ पहा. तो "इपुधि" शब्दाचा अपभ्रंश असावा, असें वाटते. इपु=बाण व इपुधि=भाता.

जनक आर्त अलोलिक । कनकवस्त्रें अमोलिक ।
पायघडिया कितीयेक । पुष्पें मंडित आंथरिती ॥ ५८ ॥
ते समई शोभायमान । गंधर्व नट गायेन ।
किन्नर कळा विराजमान । मात हो हो जातसे ॥ ५९ ॥
रथ क्षणक्षणां स्थिरावे । अप्टनायकाचे थवे ।
रागवेळाचे उठावे । नृत्य घमंड होतसे ॥ ६० ॥
ते समईचा आनंद । सकळ जना परमानंद ।
उभय भार्गी स्वानंदकंद । रघुनाथजि मिरवे ॥ ६१ ॥
मिरवतां च्यापपाणी । जाली त्रैलोक्याची दाटणी ।
विमाना विमानें खणाखणी । आकाशा ठेलून दाटलीं॥६२॥
थोर आनंदाचा गजर । पुष्पें वर्षती सुरवर ।
ते समई जयजयकार । देवजनाचे दाटले ॥ ६३ ॥
जनकआवडीचे विळास । रंग तुंबळलासे बहुवस ।
नाना उपचारीं जगदीश । रघुनाथजि शोभला ॥ ६४ ॥
जाला मिरवणेचा गजर । तों प्रकाशला दिनकर ।
आला जानवसा गजभार । लक्ष्मीपूजन मांडलें ॥ ६५ ॥
ब्राह्मणमंत्राचे घोश । मंगळतुरांचे विळास ।
समस्त पाहाती कौतुकास । लक्ष्मी लक्ष्मी पूजितसे ॥६६॥
विधियुक्त वि[१]ह्ळी । लक्ष्मी पूजिली मैथळी ।
ब्राह्मण ह्मणती ये काळीं । भाणवस निरवी कौसल्ये॥६७॥
कनकमणीचे भाणवस । राहातें ग्रह जें रमेस ।
अष्टमाहासिधीचे विळास । जिकडे तिकडे विलसती ॥ ६८॥
तें भाणवसं रामजननी । निरवी जनकनंदनी ।
ह्मणे सुंदरे विळासिनी । तुझें तूं हें सांभाळी ॥ ६९ ॥
गोड अक्षरें अतिलोभें । रसाळें बोले अर्थलाभें ।
सर्वस्व मी निरावलंबे । मनमोहनी हें तुझें ॥ ७० ॥

१ " विल्हाळी " पाठांतर. २ उतरंडघर ( हंसकोश ), स्वयंपाकघर, चूल.

केली भाणवस निरवण । माता कौसल्या सुलक्षण ।
राजराण्या त्याममाण । जनकवाळी निरविलें ॥ ७१ ॥
जो जो ते समईंचा प्रसंग । तो तो जाला येथासांग ।
तों राजआज्ञा ते अभंग । निशाणा घावं घातले ॥ ७२ ॥
आगाज होती धडाड । संभ्रमें निघालें वऱ्हाड ।
सेना चत्वार जाड जाड । अनर्घ्ये वस्तु चालिली ॥ ७३ ॥
जैसी आली मिरवण । राम ऋषी ब्राह्मण ।
साधु,संत मुनि गण । समस्त रथीं चालिले ॥ ७४ ॥
थोर वऱ्हाडाची नवाई । नभीं दुंदुभीची घाई ।
विमानें विमान ते समई । देव अयोध्ये चालिले ॥ ७५ ॥
राजभाराचा उछाव । चालिले प्रधानसमुदाव ।
रथछत्राचे नवलाव । राये राये निघाले ॥ ७६ ॥
छेत्रें पताका तेजपुंज । रत्नखचित झळके ध्वज ।
रामरथ मंगळराज । मध्य मंडळीं शोभला ॥ ७७ ॥
वामभागीं जनकनंदनी । रथीं राम सिंहासनीं ।
दुभागीं चामरें घेउनी । भक्तजन दाटले ॥ ७८ ॥
सीतेसहित सीतापति । परम शोभला दिव्य रथीं ।
सुंदर शाम भक्तपति । भक्त सेवा जाणविती ॥ ७९ ॥
सुमंत सारथी शोभायमान । विडिया देती सनकनंदन ।
पीकपात्र तें घेऊन । सनत्कुमार शोभले ॥ ८० ॥
विधीचे मानससुत । समर्था सेवा जाणवित ।
रायापुढें विराजत । रामरथ चालिला ॥ ८१ ॥
वशिष्ठादि योगेश्वर । व्यासादि मुनिवर ।
रामवेष्टित अपार । रथ तयाचे चालिले ॥ ८२ ॥
कौशिक आणी वाल्मीकादिक । संत तापसी सकळिक ।
रथीं मंगळदायक । ब्राह्मणमात्र चालिले ॥ ८३ ॥

---

१ निस्साण=नगारा. २ " घाय " पाठांतर.

रथ चालिले सुंदर । मार्गें पुढें गजभार ।
तया पाठीसी अपार । सिबिका चालिल्या स्त्रियांच्या ॥८४॥
गजअंदुचे दणदणाट । वाजितळाचे खणखणाट ।
थोर रथांचे घडघडाट । अयोध्यापति चालिला ॥ ८५ ॥
थोर राजा चक्रवति । सर्वे पृथ्वीचे नृपति ।
राजभारें[1] मिथिळापति । बोळवित चालिला ॥ ८६ ॥
सुमेधा जानकीची[2] माता । सर्वे अंगना अमिता ।
सिबिका चालिल्या श्रीमंता । नगरलोक चालिले ॥ ८७ ॥
दोन्ही दळें संभ्रमेंसी । श्रीमंत चालिली त्या समयासी ।
भेरी लागल्या आकासी । देवविमानें चालिलीं ॥ ८८ ॥
दोन्ही दळें आळंकृत । वऱ्हाड चालिलें श्रीमंत ।
तीन योजने पर्यंत । मिथिळ बोळवित आला ॥ ८९ ॥
तव अयोध्येचा नृपवर । उभा राहिला राजभार ।
मिथिळेशासी उपचार । वचनें बोलता जाला ॥ ९० ॥
परमप्रीतीचेन भरें । बोले स्तुतीचीं उत्तरें ।
ह्मणे आतां नृपवरें । आज्ञा दिल्ही पाहिजे ॥ ९१ ॥
ह्मणे राहावें मिथिळापति । दुरि आलेती आतां किती ।
थोर पावलों विश्रांति । तुमच्या शरीरसमंधें ॥ ९२ ॥
विदेहा श्रेष्ठा मुगुटमणी । कीर्ति गाजे वेदपुराणीं ।
तुह्मासारिखा ब्रह्मांडखाणीं । पाहातां दुजा न दिसे ॥९३॥
*तव राजा बोले उत्तरें । तुह्मी मोक्षध्वज सोईरे ।*
तुमच्या कृपेच्या आधारें । धन्य जालों त्रिजगीं ॥ ९४ ॥
सुर्यवंशासी सोईरिक । हे चि आश्चिर्य कोण्ही येक ।
विशेष हा रघुनायक । जावाईत्वें जोडला ॥ ९५ ॥

---

१ "राजभार" पाठांतर. २ "जनकाची कांता" असा पाठ बाडांत प्रथम होता, तो खोडून प्रस्तुतचा केला आहे.

माझी कन्या हे उत्तमा । सुंदर सीता निरोपमा ।
इतुकीसी देऊन तुह्मा । पाईं दास्य जोडिलें ॥ ९६ ॥
धन्य माझें जिवित्व । धन्य माझें कर्तुत्व ।
धन्य माझें सत्यत्व ।[1]आजी फळासी आलें ॥ ९७ ॥
शरीरसमंधाच्या गुणें । सफळ जालें माझें जिणें ।
राया उपचारी बोलणें । हे उत्तरें आमुचीं ॥ ९८ ॥
परस्परें सन्मान । सुंदर उत्तरें बहुमान ।
मग जनकनंदनीलागून । कायें बोलता जाला ॥ ९९ ॥
श्रेष्ठवचन परिपाळण । तुटों नेदावें अनुसंधान ।
रामचरणीं अनन्य । कदां वियोग नसावा ॥ १०० ॥
तुजकरितां जालों मान्य । तिहीं लोकीं धन्य धन्य ।
राम जावाईत्वें पूजन । तुझेन योगें साधलें ॥ १ ॥
ह्मणे माझी येश कीर्ति । तां वाढविली सुमति ।
रामचरणाची प्राप्ती । तुजकरितां मज जाली ॥ २ ॥
पतिव्रतधर्माचे पाळणी । सर्वां श्रेष्ठ सुलक्षणी ।
आवो कन्ये रामचरणीं । अनन्यसेवे असावें ॥ ३ ॥
ह्मणे कन्ये गुणवंति । वौंशतारक सुमति ।
मस्तक अवघ्राणी भूपति । अखंड राज्य करावें ॥ ४ ॥
तैसी च जानकीची जननी । ह्मणे सुंदरे विळासिनी ।
कैसें असावें तुजवांचुनी । राज्य उदास जालें ॥ ५ ॥
तुजकरितां वडिवार । थोर जाला होता विस्तार ।
तो[2] हा समस्त जोजार । आमुचा तां चारिला ॥ ६ ॥
आतां आह्मीं उदासीन । सेविलें निरंजन वन ।
तूं सुबुधि मनमोहन । सहित राज्य करावें ॥ ७ ॥

---

१ आईबापानीं केलेल्या ह्या उपदेशाचें परिपालन कोणा हि मुलीला कल्याणप्रद च होईल. २ "तो" पाठांतर.

तुझेनि गुणें जालों मान्य । आम्हुचा वौंश केला धन्य ।
आतां रामपदीं अनन्य । सेवे तत्पर असावें ॥ ८ ॥
वधुसहित मिथिळापति । कौसल्या नमिली अति प्रीति ।
आणी सुमित्रा कैकेमति । नमन केलें[1] ॥ ९ ॥
वधुसहित जनकराज । सुंदर रामपदांबुज ।
वंदूनियां तेजपुंज । काये बोलता जाला ॥ ११० ॥
ह्मणे म्यां धनुष्यपण केला । सत्य आपुल्या हिताला ।
हें न कळे इतरांला । तूं जाणसी सर्वज्ञा ॥ ११ ॥
तरि म्या कष्टविलें तुज । हा अन्याय क्षमा करी मज ।
तूं सुंदरमूर्ति वरदराज । आर्त माझें पुरविलें ॥ १२ ॥
भक्ताकारणें नाना चरित्रा । तूं करिसी परम पवित्रा ।
सुखमूर्ति राजीवनेत्रा । दास मी तुझा राघवा ॥ १३ ॥
मग तो करुणानिधि अवाप्तकाम[2] । भक्तवछळ रघोत्तम ।
जनकातें उत्तमोत्तम । काय बोलता जाला ॥ १४ ॥
सर्वभावें मयर्पित । केलें तुह्मीं हें उचित ।
भक्तवछळ बोलत । सुखविश्रांति राहावें ॥ १५ ॥
जनक विश्रांति पावोन । रामरथा सव्य घेऊन ।
मग राजेआज्ञेकरून । परिवारेंसीं चालिला ॥ १६ ॥
सीतेसहित सीतावर । दिव्य रथीं मनोहर ।
सकळवेष्टित राजभार । अतिसंभ्रमें चालिले ॥ १७ ॥
वऱ्हाड चालिलें शोभायमान । तव उठिलें दुष्ट[3] चिन्ह ।
वायो सुटला गहन । रक्तबुंद झडपिती ॥ १८ ॥
पृथ्वीचा रज उसाळ । आकाश जालें डहुळ ।
कर्कश शब्दाचे उर्छाळ । नादें नभ दणदणी ॥ १९ ॥
तव राजा ह्मणे वशिष्ठाला । प्रळय कैंचा स्वामी आला ।
सुखरूप जातां आह्माला । मध्यें चि विघ्न वोडवलें ॥ १२० ॥

---

१ "राजराण्या वरच्या रीती । समस्तां नमन केलें ॥" पाठांतर. २ पूर्णकाम. ३ "दुश्चिन्ह" पाठांतर. ३ धुरोळा. ४ आधिक्य. ५ "उठिलें" पाठांतर.

वशिष्ट ह्मणे भूपति । येश आहे प्रळया अंती ।
न धरी कांक्षया चित्ती । जयरूप प्रळय हा ॥ २१ ॥
तव ते समई सकळ । भार्गव देखती माहाबळ ।
क्षेत्रीअंतक केवळ । अति सत्वर पातला ॥ २२ ॥
जटा सुटल्या पुष्टीवरि । धनुष्यबाण असे करीं ।
माहावीर वल्कलधारी । रामाकडे येतसे ॥ २३ ॥
धाकें राजा दशरथ । ह्मणे मांडला अनर्थ ।
क्षेत्रीअंतक हा येथार्थ । कैचा येथें पातला ॥ २४ ॥
पुढें जाला त्वरें राजा । ह्मणे भार्गवा अर्घ्यपूजा ।
करीन तुझी योगीराजा । मज सनाथ करावें ॥ २५ ॥
राजा भाकितसे दैन्य । भार्गवा नाही तें गुमान ।
रामासन्मुख येऊन । काये बोलता जाला ॥ २६ ॥
ह्मणे अरे रे राजकुळा । स्त्रीवध केला तां निर्बळा ।
कोण पुरुषार्थाचा सोहळा । तिहीं लोकीं गाजविला ॥ २७॥
राम वदे फरशधरा । त्रैलोक्या पीडिती निशाचरा ।
ते म्या मारिली भृगुकुमरा । माता नव्हे ताटिका ॥ २८ ॥
मागुता बोले भृगुनंदन । पाळिलें मातेचें वचन ।
येकवीस वेळां रणकंदन । पृथ्वी निक्षेत्री म्या केली ॥२९॥
वीरवाहोचें वचन गाढें । क्षेत्री तरि मी तुजपुढें ।
शक्ति सामर्थ्य रोकडें । पुरुषार्थ तुझा मज दावी ॥ १३० ॥
भार्गव ह्मणे रे कांबिट । तुवां मोडिलें तें जुनाट ।
सर्व शक्तीचें राहातें पीठ । सामर्थ्य वैभव हें माझें ॥ ३१ ॥
हें धनुष्य तेजपुंज । वोढितां जिंकिलें तां मज ।
घोर च्याप वीरराज । ह्मणवितोसी तरि वेई ॥ ३२ ॥
प्रतापदिनमणी रघुवीर । काळ न राहे ज्यासमोर ।
भार्गवा हेळिलें[1] उत्तर । च्याप झिडकून घेतला ॥ ३३ ॥

---

1 तिरस्कारयुक्त केलें.

तव तो आजानुवाहु चूडामणी । रथीं उभा कोदंडपाणी ।
सीत चढऊनि ते क्षणीं । शर लाविला तत्काळ ॥ ३४ ॥
वक्रांग तें वज्रठाण । कान्हाडी वोढिली आकर्ण ।
वदे भार्गवा हा वाण । कोणेकडे टाकावा ॥ ३५ ॥
तें देखोन चकित भार्ग । ह्मणे हा अवतार श्रेष्ठवर्ग ।
वदे माझा गमनमार्ग । त्रैलोकींचा तो मोडी ॥ ३६ ॥
इतुकें बोलतां वचन । शरें कवळिलें गगन ।
भार्गवगति खुंटून । रामभातां प्रवेशला ॥ ३७ ॥
भार्गवगर्वाचा परिहार । रामशरें केला चुर ।
देव करिती जयजयकार । पुष्पवृष्टी होतसे ॥ ३८ ॥
नभीं दुंदुभी दणदणाट । राजतुरांचा पुरला पेटे ।
तेणें आकाशाचें पोट । उलों पाहे तडतडां ॥ ३९ ॥
रामप्रताप अद्भुत गति । ऋषी ब्राह्मणा तोष चित्तीं ।
संत महंत पुण्य मूर्ति । समस्त सुख पावले ॥ १४० ॥
रामआज्ञेकरून । भार्गव गेला लज्यायमान ।
भूपति आनंदगहन । वऱ्हाड पुढें चालिलें ॥ ४१ ॥
नभीं देवाचीं विमानें । चालताती दिव्यायमानें ।
धरा पृथ्वीच्या भूपानें । राजभारें दाटली ॥ ४२ ॥
तव दिसे अयोध्यापुर । नेणों जैसें वैकुंठनगर ।
ध्वजा पताका अपार । कनकमय झळकती ॥ ४३ ॥ ॥
तोरणें झळकती मुक्तांचीं । जाळांधरें गोपुराचीं ।
तुरें वाजती पुरीचीं । नाना जिनसी दणदणा ॥ ४४ ॥
तव त्या कुरवंड्या अंगना । घेऊन आल्या शोभायमाना ।
आरत्या कौसल्यानंदना । निंबलोण उतरिती ॥ ४५ ॥
वऱ्हाडेंसीं राजभार । पुरीं प्रवेशला सीतावर ।
वेणीस्वामी सुंदर । निजधामीं राहिले ॥ ४६ ॥

---

१ "कानाडी" पाठांतर=आकर्ण धनुष्यदोरी. २ आवाज.

हें सीतेचें स्वैवर । वाल्मीक बोलिला विस्तार ।
रम्य रसाळ सुंदर । नाना विळासें करूनि ॥ ४७ ॥
वाल्मीक बोलिला गहन । तें वांछीत होतें मन ।
तव त्याचा साभिमान । सर्वज्ञ रायें घेतला ॥ ४८ ॥
हें बोलणें येथार्थ । कर्ता राम याचा समर्थ ।
कोणा सांगों हा गुह्यार्थ । माझा मीच जाणें ॥ ४९ ॥
हे राघवाची कथा । कर्ता मी नव्हे सर्वथा ।
सत्य आवडलें समर्था । ग्रंथ सिधी पावला ॥ १५० ॥
रामकथा हे प्रसिध । आइकिल्याचें फळ सिध ।
येकेकाक्षरें वध । मोक्ष पावती हें वचन ॥ ५१ ॥
आणी कामना परत्वा । फळ चढवी महत्वा ।
श्रवण सांडवी लघुत्वा । अमोघ इछा पुरविते ॥ ५२ ॥
भक्ति करितां याचें पठण । अथवा करितां श्रवण ।
त्याचे मनोरथ पूर्ण । कर्ता राम समर्थ ॥ ५३ ॥
हें वचन नव्हे मनधरणी । या ग्रंथाची हे आयणी ।
प्रसिध त्रैलोक्य मिरवणी । ठसा रामकथेचा ॥ ५४ ॥
जें रघोत्तमाचें चरित्र । तें सर्व भावें पवित्र ।
ज्याच्या श्रवणें सत्पात्र । धन्य होइजे त्रिजगीं ॥ ५५ ॥

*

---

१ एकैकमक्षरं पुंसा महापातकनाशनम् । २ तत्त्वनिर्णयाची इच्छा.

~ विवाहमंगलीं याचें पठण । अथवा करितां श्रवण ।
वधुवरांचे मनोरथ पूर्ण । कर्ता राम समर्थ ॥ १ ॥
मनोभावें श्रवणमनन । हें चि जन्माचें सार्थक जाण ।
जेणें जोडती सद्गुरुचरण । जें अधिष्ठान सर्व सुखाचें ॥ २ ॥
अशी हि या ग्रन्थाची फलश्रुति समजावी.

जें जें भक्ताचें अंतकर्णी । तें तें पुरवी च्यापपाणी ।
याकारणें सर्वगुणी । रघुनाथजि भंजावें ॥ ५६ ॥
शुध कार्तिकी चतुर्दसी । ग्रंथ पावला सिधीसीं ।
रामपदांबुजीं विलासी । अनन्य भावें ठेविला ॥ १५७ ॥

इति श्री रामायणे । आदिकांडे । सीतास्वयंवरो नाम । समास ॥ १४॥
संपूर्णमस्तु ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ७ ॥




१ बाडांत यानंतर च "इति श्री" वगैरे ग्रन्थसमाप्तीचा मजकूर असून नंतर "शुध कार्तिकी चतुर्दसी" ही ओवी दिली आहे. त्यानंतर पुढील श्लोक आहेत.

यदक्षरं पदभ्रष्टं मात्राहीनं च यद्भवेत् ।
तत्सर्वं क्षम्यतां देव राघवाय नमोस्तु ते ॥ १ ॥
अक्षरबिंदुमात्राणि पदपादाक्षराणि च ।
न्यूनानि चातिरिक्तानि क्षम्यतां परमेश्वर ॥ २ ॥
तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥ ३ ॥
भग्नपृष्ठकटिग्रीवास्तब्धदृष्टिरधोमुखम् ।
कष्टेन लिखितं ग्रन्थं यत्नेन प्रतिपालयेत् ॥ ४ ॥

व नंतर पुढील ओवी असून शेवटीं एकंदर ओवीसंख्या दिली आहे.

समर्थस्वामीकृपा श्रेष्ठ । सकळ कल्याण वरिष्ठ ।
त्याची दया श्रेष्ठ । मज केशवासी ॥ १ ॥

ओव्या संख्या १५६८

श्री

# रामदास आणि रामदासी ग्रन्थमाला

श्री क्षेत्र जांब, चाफळ, सज्जनगड, डोमगांव, शिरगांव, टाकळी, इंदूरबोधन, भालगांव, कण्हेरी, तीसगांव, तडवळे, बीड, मर्डे, येळेकोळी, परळी, अंबाजोगाई, निलंगे, आपचंद, तंजावर, मन्नारगुडी इत्यादि मठांतील रामदासी संग्रह मिळवून तो प्रकाशित करण्याचें काम आम्हीं सुरू केलें आहे. खुद्द श्रीकल्याणस्वामींच्या हातचा संग्रह आम्हांस उपलब्ध झाला आहे. श्रीसमर्थांचे शिष्य व प्रशिष्य यांच्या कवितेचा विपुल संग्रह सभेला मिळाला आहे. श्रीसमर्थसांप्रदायाचा इतिहास लिहिण्यास अत्यंत उपयुक्त अशा कागदपत्रांचा हि संग्रह सभेजवळ झाला आहे. मराठ्यांच्या इतिहासाचें खरें रहस्य या सर्व संग्रहावरून व्यक्त होणार आहे. हीं सर्व कविता व कागदपत्रें वगैरे छापलीं जाणें अत्यंत आवश्यक आहे. हें कार्य हल्लीं होत आहे त्याहून त्वरित व्हावयास पाहिजे अशी फार इच्छा आहे. पण काय करावें ? एक हजार कायम ग्राहक मिळतील तर वर्षांचे दोन भाग काढणें अगदीं शक्य होईल. ज्या सांप्रदायानें एकवार धर्मसंमूढचेत महाराष्ट्राला महाराष्ट्रधर्म शिकवून त्यांत चैतन्य उत्पन्न केलें, त्या सांप्रदायांतील ग्रंथांचा संग्रह करण्यास उभ्या महाराष्ट्रांत एक हजार कायम ग्राहक मिळणें काय अशक्य आहे ? प्रत्येक विचारी, इतिहासप्रिय, धर्मशील महाराष्ट्रीय या मालेचा कायम ग्राहक होईल असा भरंवसा आहे. ज्या सद्गृहस्थांनीं ग्रंथमालेस कायम ग्राहक होऊन आजपर्यंत मदत केली त्याबद्दल सभा आभारी आहे.

आतांपर्यंत श्री **रामदास** आणि **रामदासी** ग्रन्थमालेपैकीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची किंमतीसह यादी पुढें देत आहे. बहुतेक सर्व पुस्तकांचा आकार डेमी अष्टपत्री धरला आहे. ह्या खटाटोपापासून द्रव्यरूपानें कांहीं उत्पन्न झाल्यास त्याचा विनियोग सांप्रदायाकडे च होत आहे व होईल.

# श्रीमत् दासबोध

( अस्सल व सटीप, अक्षर ठळक, आवृत्ति ३ री )

श्रीसमर्थांनीं श्रीकल्याणस्वामींच्या हातानें लिहून स्वतः शोध-
अस्सल पोथीवरून आम्हीं हा ग्रंथ छापविला आहे. श्रीसमर्थांच्या
ंत काढलेल्या तसबिरीवरून त्याचें चित्र व त्यांच्या प्रत्यक्ष पादुकांचें
अशीं दोन चित्रें एकत्र दिलीं आहेत. शिवाय मूळ प्रतीच्या एका पाठ
पृष्ठाचें व शके १६१६ तील सोनेरी प्रतींतील एका पृष्ठाचें अशीं
चित्रें त्या त्या ठिकाणीं दिलीं आहेत. जरूर त्या टिपा देऊन कठीण
टात्मक ओव्यांचा सांप्रदायिक अर्थ दिला आहे. दासबोधांतर्गत
मर्थचरित्र व श्रीसमर्थसांप्रदायाचीं लक्षणें देऊन रा. शंकर श्रीकृष्ण
यांनीं विस्तृत प्रस्तावना लिहिलेली निराळी वांचली आहे. ग्रंथांतील
ीं विषयांची शेवटीं सूची दिली आहे. एकंदर पृष्ठसंख्या ६५० वर
. रेशमी प्रतीची किंमत रुपये २, कापडीची व सुट्या पोथीची किं.
१८१२ आहे व प्रस्तावनेची किंमत ८९ आहे; परंतु दासबोधाबरो-
घेणारास ८४.

## २ श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें

श्रीसमर्थांचीं चरित्रें आतांपर्यंत जेवढीं प्रकाशित आहेत, तेवढीं
ं त्यांच्या पश्चात् ८०।९० वर्षांनंतर लिहिलेलीं आहेत. प्रत्यक्ष त्यांना
ंनीं पाहिलें होतें, त्यांचा ज्यांना अनुग्रह होता, अशा एकाद्या शि-
ानें लिहिलेलें त्यांचें चरित्र प्रकाशित नव्हतें, तें या पुस्तकांत शेवटीं
ले आहे. श्रीरामदास व श्रीशिवाजी महाराज इत्यादि विषयांवर रा.
र यांनीं लिहिलेली प्रस्तावना या भागाला जोडली आहे. या ग्रंथाची
ष्ठसंख्या २५० आहे. किंमत रु. १.

# ३ श्रीसमर्थांची कविता

यांत खुद्द श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या बाडावरून श्रीसमर्थांची कविता छापली आहे. श्रीसमर्थांचें रामायण, ओव्या शतकें १४, स्फुट अभंग ३२८, पड्रिपु, पंचीकरणयोग, चतुर्थमान, मानपंचक, पंचमान, स्फुट प्रकरणें ६९, 'प्रमाणिका' वृत्तांतील फार बहारीचे स्फुट-श्लोक प्रकरणें ६१, इतकीं प्रकरणें या भागांत आहेत. कल्याणस्वामींच्या हस्ताक्षराचें आरंभीं चित्र दिलें आहे. रा. देव यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत श्रीसमर्थांचा शिष्यसांप्रदाय, श्रीसमर्थांचे मठ, श्रीसमर्थांचें रामायण व श्रीसमर्थांची कविता, अशीं चार प्रकरणें आहेत. समर्थांची बहुगोल अशी बरी च अप्रकाशित कविता या ग्रन्थांत आली आहे. पृष्ठसंख्या ५५० वर आहे. किंमत रु. २.

# ४ श्रेष्ठांची कविता

श्रीसमर्थांचे वडिल बंधु **गंगाधर;** यांना च **रामीरामदास** उर्फ **श्रेष्ठ** ह्मणत. **भक्तिरहस्य** व **सुगमोपाय** असे यांचे दोन अप्रतिम ग्रन्थ व इतर स्फुट कविता या भागांत दिली आहे. भक्तिरहस्याचा विषय नांवावरून च व्यक्त होत आहे. ग्रन्थ फार च प्रेमळ आहे; सुगमोपाय हा ग्रन्थ वेदांतपर असून त्यांत **तत्त्वमसि** या महावाक्याचा विचार केला आहे. प्रस्तावनेंत रा. देव यांनीं अप्रकाशित साधनांवरून श्रेष्ठांचें अल्प चरित्र दिलें आहे व श्रेष्ठांच्या कवितेचें रहस्य दाखविलें आहे. पृष्ठसंख्या ५२५ वर आहे. किंमत रु. २.

# ५ श्री श्लोक मनाचे

हे खुद्द श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या बाडावरून छापले आहेत. मनाचे श्लोक ह्मणजे श्रीसमर्थांच्या एकंदर शिकवणीची

सूत्रें होत. प्रत्येक श्लोकावर श्रीसमर्थवचनाधारें विपुल टिपा दिल्या आहेत, कीं तेणेंकरून सर्व श्लोकांचा अर्थ लहान मुलांना हि समजावा. शके १५७१ चे सुमारास श्रीक्षेत्र चाफळ येथें, अंगापुर डोहांतून काढून, ज्या श्रीरामाच्या मूर्ति श्रीसमर्थांनीं स्थापन केल्या, त्यांचें चित्र आरंभीं देऊन एकंदर श्लोकांचें स्वरूप प्रस्तावनेंत दर्शविलें आहे. शेवटीं श्लोकांचें संस्कृत रूपांतर देऊन पाठ करण्यास उपयुक्त अशी सूचि दिली आहे. पुस्तक खिशांत मावण्याजोगें झालें आहे. किमत आ. ८५

# ६ स्वानुभवदिनकर

या ग्रंथाची मौज अशी आहे कीं, तो प्रत्यक्ष श्रीसमर्थशिष्यानें लिहिला असल्यामुळें त्यांत श्रीसमर्थांविषयीं व श्रीसांप्रदायाविषयीं पदोपदीं जे उल्लेख आले आहेत ते प्रेमळ वाचकांस संसाराचा विसर पाडून श्रीसमर्थचरणीं आनन्दांत लोटांगण घालावयास लावतील. असा हा प्रासादिक ग्रन्थ श्रीसमर्थसांप्रदायिकांना आवडता झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी मला पूर्ण खात्री आहे. दिनकरांनीं विचारावें व श्रीसमर्थांनीं सांगावें अशा संवादरूपाचा हा ग्रन्थ आहे; ह्मणजे ग्रन्थांत श्रीसमर्थांचीं च वचनें पुष्कळशीं आहेत. पृष्ठसंख्या५००वर. श्री दिनकरांनीं ज्या वृद्धेश्वराचे देवालयांत पुरश्चरण केलें, त्याचें चित्र आरंभीं देऊन, प्रस्तावनेंत त्यांचें चरित्र दिलें आहे. किमत १८१२

# ७ दासविश्रामधाम

श्रीमत् दासबोधाच्या तिप्पट मोठा असा हा श्रीआत्मारामहाराजकृत श्रीसमर्थचरित्रपर मौल्यवान ग्रन्थ छापत आहे. संपूर्ण ग्रन्थाची आगाऊ किंमत ४॥ रु. देऊन जे आगाऊ वर्गणीदार झाले आहेत, त्यांकरितां २४८ पृष्ठांचा प्रथम खंड तयार झाला आहे. इतरांस मागाहून संपूर्ण ग्रन्थाची किं. रु. ६

# ८ समर्थप्रताप

श्री वेणुबाई यांच्या परंपरेतील गिरिधरस्वामी, मठ बीड, यांनीं हा प्रताप अत्यंत प्रेमभरानें वर्णिला आहे. गिरिधरांना लहानपणीं श्रीसमर्थांचा कांहीं काळ सहवास घडला असल्यामुळें श्रीसमर्थांचें हें चरित्र फार च हृदयंगम व विश्वसनीय झालें आहे. त्याचे २१ समास आहेत. ग्रन्थाची पृष्ठसंख्या १४४ असून ८६ पृष्ठांच्या प्रस्तावनेच्या पहिल्या भागांत गिरिधरांच्या एकंदर ४१ ग्रन्थांचें पर्यालोचन केलें आहे व दुसऱ्या भागांत श्रीसमर्थांच्या कांहीं गोष्टी दिल्या आहेत ग्रन्थामध्यें (१) प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें (२) श्रीक्षेत्र चांफळचें व (३) श्रीसमर्थसमाधीचें, अशीं तीन चित्रें दिलीं आहेत. बांधणी कापडी सुबक केली आहे. किंमत ८।१२

## ९ श्रीसांप्रदायाचीं कागदपत्रें
## १० श्री करुणाष्टकें
## ११ श्रीसमर्थांचीं लघुकाव्यें

} छापत आहेत

## १२ सीतास्वयंवर

श्रीसमर्थांच्या श्रेष्ठ शिष्यिणींपैकीं श्रीवेणाबाई यांचा हा प्रेमळ ग्रन्थ होय. त्यांचा अधिकार फार मोठा होता. महाराष्ट्रबंधुभगिनींना अत्यंत प्रिय व्हावा असा हा ग्रन्थ आहे. किंमत ८।१०

☞ तयार असलेल्या वरील नऊ ग्रन्थांची किंमत रु. १६।८७ होते, परंतु ते सर्व घेऊन, पुढील भाग जसजसे तयार होतील तसतसे ते घेण्याचें आश्वासन देणाऱ्या मालेच्या **कायम ग्राहकांस** वरील नऊ ग्रन्थांची किंमत अवघी रु. १३।८५ पडते. टपालखर्च सर्वांना च वेगळा. तरी सवड असणाऱ्या प्रत्येक महाराष्ट्रीयानें कायम ग्राहक होऊन या बहुमोल ग्रन्थांचा संग्रह करावा अशी विनंति आहे.

चिटणीस-सत्कार्योत्तेजक सभा-धुळें, खानदेश.